ज्ञानदेवाच्या काळापासून
जिचा ओघ
अखंड वाहत आला आहे
त्या
**महाराष्ट्रीय रसिकांस**

# न झालेलें भाषण

झालेल्या गोष्टींपेक्षां न झालेल्या गोष्टींविषयीं मनुष्याच्या मनांत अनावर कुतूहल असतें यांत शंका नाहीं. पहिल्या तारखेला हातांत येणाऱ्या पगाराबद्दल प्रत्येकजण उदासीन असतो—निदान त्याच्याविषयीं काव्यमय कल्पना करण्याच्या स्थितींत तरी असत नाही. पण साधा कारकून सुद्धां सोडतींतलें एक रुपयाचें तिकीट इतकें जपून ठेवतो नि लॉटरीच्या निकालाच्या तारखेकडे त्याचे डोळे इतक्या उत्सुकतेनें लागलेले असतात कीं तिऱ्हाइताला हा यःकश्चित् कारकून नसून कुणीतरी महाकवि आहे असेंच वाटावें ! अनुभवामागून रखडत चालण्यापेक्षां आशेमागून धांवत सुटण्यांत आबालवृद्धांना जी गंमत वाटते ती काय उगीच ? महिना पांच रुपये मिळविणाऱ्या मोलकरणीपासून दरमहा दोन हजार रुपये मिळविणाऱ्या सिनेमानटीपर्यंत कुठल्याही स्त्रीच्या अंतःकरणांत डोकावून पाहिलें तर ती जागृतीपेक्षां स्वप्नांतच अधिक रंगून गेलेली आहे असें आढळून येईल. ‘ झालेल्या गोष्टी ’ म्हणजे फुललेलीं फुलें असतात. कालपुरुषाचा प्रत्येक निःश्वास त्यांना कोमेजवून टाकीत असतो. पण ‘ न झालेल्या गोष्टी ’ या न उमललेल्या कळ्या असतात ! त्यांच्या सुगंधाविषयीं नि सौंदर्याविषयीं मधुर कल्पना करण्यांतच केवढा तरी आनंद असतो !

या अगर अशाच प्रकारच्या कल्पना करीत माझें हें ‘ न झालेलें भाषण ’ ऐकणारांची थोडीफार निराशा होईल हें आरंभींच सांगून टाकलेलें बरें. कित्येकांनीं या भाषणाविषयीं मनांत अनेक तर्कहि केले असतील ! अलीकडे भाषणें ठरवून तीं न होऊं देण्याची जी एक लाट आली आहे तिच्यांत खांडेकरहि सांपडले असावेत, कुठल्या तरी कॉलेजांत किंवा नागपूरसारख्या सुप्रसिद्ध शहरांत त्यांचें भाषण ठरलेलें असावें—आणि श्रोत्यांना आपल्या कानांपेक्षां तोंडांचा नि पायांचा अधिक उपयोग करण्याची लहर आली असल्यामुळें तें भाषण पार पडलें नसावें; अशा प्रकारची तर्कपरंपरा कुणाच्या मनांत आली असल्यास तो त्याचा दोष नव्हे; तें सध्यांच्या परिस्थितीचें प्रतिबिंब आहे एवढेंच मी म्हणेन !

माझ्या या न झालेल्या भाषणाला अशा प्रकारची ऐतिहासिक पार्श्वभूमि नसल्यामुळें कित्येकांना तें अळणी वाटण्याचाही संभव आहे. पण जून १९४० मध्यें जमखिंडी येथें भरलेल्या दक्षिण–महाराष्ट्र–साहित्यसंमेलनाचें अध्यक्षीय भाषण बाजूला ठेवून माझ्या ज्या पांच भाषणांचा या पुस्तकांत संग्रह करण्यांत आला आहे त्यांच्याविषयीं व त्यांच्या अनुषंगानें साहित्य-संमेलनांतलीं अध्यक्षीय भाषणें किंवा साहित्यिकांचीं इतर भाषणें यांच्या-विषयीं मी मनमोकळेपणानें थोडी चर्चा करणार आहें.

गेल्या दहा वर्षांत मराठी साहित्यिकांना उच्चीचे ग्रह आले यांत शंका नाहीं.

पैशाच्या दृष्टीनें नव्हे ! कारण पहिल्या दर्जाच्या दहावीस विविध लेखकांचा चांगल्या रीतीनें चरितार्थ चालूं शकेल अशी परिस्थिति अजून सुद्धां उत्पन्न झालेली नाहीं. लेखन ही हवेसारखी फुकट मिळणारी गोष्ट नसून नळाच्या पाण्याप्रमाणें त्यालाही मोबदला द्यावा लागतो ही कल्पना गेल्या दहा वर्षांत दृढमूल झाली आहे एवढेंच ! त्यामुळें कित्येक लेखकांचा कागदशाईचा खर्च वसूल होत आहे, अनेकांची विडीकाडीची सोय होत आहे, कांहींच्या कुटुंबांना मीठभाकरी मिळत आहे आणि एखाददुसरा मोटारींतहि बसूं शकत आहे. पण चित्रपटांचे कथालेखक व पहिल्या चार-पांच कादंबरीकारांत ज्यांची गणना होते असे साहित्यिक सोडले तर लेख-नाचा मोबदला घेतांना ज्याचा 'शतं' शीं संबंध येतो असा लेखक विरळाच सांपडेल. अहोरात्र लेखणी शिणविणाऱ्या उपसंपादकांना किंवा वृत्तपत्र-पंडितांना सुद्धां जिथें दहापंधरा वर्षें नोकरी केलेल्या मॅट्रिक कारकुनापेक्षां अधिक पगार मिळत नाहीं, तिथें स्वतंत्र अगर हौशी लेखकांना काय मिळणार ? भुकेच्या वेळीं काव्यांतले सर्व रस निरुपयोगी ठरतात हा अनुभव वांट्याला आल्यामुळें ज्यांना लेखनव्यवसाय अंशतः अगर संपूर्णतः सोडावा लागला व त्यामुळें ज्यांच्या प्रतिभेचा पूर्ण विकास कधींच होऊं शकला नाहीं अशीं उदाहरणें आपल्याकडे कांहीं थोडींथोडकीं नाहींत !

पण अनुकूल परिस्थितीमुळें असो अथवा प्रतिकूल परिस्थितीशीं झग-डत राहिल्यामुळें असो, ज्यांनीं लेखनव्यवसाय अखंड केला त्यांना गेल्या

दहापंधरा वर्षांत कीर्ति, मानसन्मान व लोकप्रियता या दृष्टीनीं कुरकुर करायला फारशी जागा राहिली नाहीं. मागच्या पिढींत कादंबरीकार म्हणून हरिभाऊ अत्यंत लोकप्रिय होते. पण त्या लोकप्रियतेचें स्वरूप बरेंचसें अव्यक्त होतें. मूठभर सुशिक्षित वगळल्यास हरिभाऊंना चाहणारा वर्ग घराच्या चार भिंतींबाहेर कधींच आला नाहीं. फडक्यांना वाचकांकडून येणारीं पत्रें आणि आपला आवडता कादंबरीकार म्हणून सभास्थानीं प्रचंड श्रोतृवर्गाकडून होणारा त्यांचा गौरव या गोष्टी हरिभाऊंच्या वेळीं स्वप्नसृष्टींतल्या वाटल्या असत्या ! फडक्यांच्याप्रमाणें अत्र्यांची लोकप्रियताहि मागच्या पिढींतील लोकांना अचंबा वाटावा अशीच आहे. अवघ्या आठ वर्षांत अत्र्यांनीं आठ नाटकें व तितक्याच बोलपटकथा लिहिल्या आणि अत्र्यांच्या लेखणींत चपलता, चातुर्य व चटकदारपणा यांचा मोठा चमकदार संगम झाला आहे हें तर खरेंच ! पण अवघ्या आठ वर्षांत लोकांना वेड लावणारीं पांच नाटकें गडकऱ्यांनींहि लिहिलीं होतीं, १९१५ ते १९२५ या दशकांतली वरेरकरांची नाट्यनिर्मितीहि अत्यंत आकर्षक होती आणि त्याच वेळीं खाडिलकर व बालगंधर्व या दोघांच्या कलागुणांच्या संगमाकडे हजारों लोक आवडीनें धांव घेत होते ही गोष्ट काहीं खोटी नाहीं. पण नाटककार म्हणून खाडिलकर–गडकरी–वरेरकर त्या काळीं कितीहि लोकप्रिय झाले असले तरी आज अत्र्यांनाच नव्हे, तर त्याच्यापेक्षां कमी आकर्षक अशा वाङ्मयक्षेत्रांत काम करणाऱ्या माडखोलकर, पु. य. देशपांडे, साने गुरुजी, अनंत काणेकर प्रभृति साहित्यिकांना जी वैयक्तिक लोकप्रियता लाभली आहे व जी सभासंमेलनांतल्या सत्काराच्या रूपानें वारंवार व्यक्त होत आहे, ती या वर उल्लेख केलेल्या थोर लेखकांच्या वांट्याला त्या काळीं आली असली तर अल्पांशानेंच !

या स्थित्यंतरांचीं मुख्य कारणें दोन आहेत. पहिलें, शिक्षणाचा प्रसार. शिक्षणाच्या वाढीबरोबर वाचकांची व रसिकांची संख्या वाढावी यांत नवल कसलें? दुसरें, साहित्यिकांचें वक्तृत्व. मागच्या पिढींतल्या साहित्यिकांत खाडिलकर, शिवरामपंत परांजपे, अच्युतराव कोल्हटकर वगैरे पहिल्या प्रतीचे वक्ते असूनहि त्यांनीं जें वक्तृत्व गाजविलें तें राजकारणाच्या सिंहासनावर;

सरस्वतीच्या मयूरासनावर नव्हे ! त्यांच्या तोडीच्या देवल, श्रीपाद कृष्ण, हरिभाऊ आपटे वगैरे साहित्यिकांत तर सार्वजनिक दृष्ट्या वक्तृत्व नव्हतेंच असें म्हटलें तरी चालेल. देवल कुठल्याहि जाहीर सभेंत बोलले असतील कीं काय याची शंकाच आहे. श्रीपाद कृष्णांनीं जाहीर सभेंत बोलण्याचें धाडस केलें तें चाळिशी उलटल्यावर. अभिजात विनोदी प्रतिभेमुळें त्यांचें छोटें भाषण सुद्धां चटकदार होत असे यांत शंका नाहीं; पण आपल्या वक्तृत्वाविषयीं त्यांना आत्मविश्वास कधींच वाटला नाहीं. हरिभाऊंनीं प्रांतिक राजकीय परिषदेचें स्वागताध्यक्षपद विभूषित केलेलें मला ठाऊक आहे. अनेक वर्षें ते म्युनिसिपालिटीचे अध्यक्षहि होते. ग्रंथसंग्रहालयांच्या अध्यक्ष-स्थानांवरून त्यांनीं केलेलीं भाषणें अत्यंत मार्मिक आहेत. पण रूढ अर्थानें तीं भाषणें असलीं तरी तत्त्वत: ते चर्चात्मक निबंधच आहेत. म्हणजे सध्यांच्या साहित्यिकांप्रमाणें त्यांनीं वाङ्मयविषयक भाषणें क्वचित्‌च केलीं असतील. फडके आणि अत्रे यांच्या लोकप्रियतेला त्यांचे लेखन जितकें कारणीभूत आहे, तितकेंच त्यांचें वक्तृत्वहि आहे. या दोघांपैकीं एकापाशीं मधुर मुरली आहे तर दुसऱ्याजवळ मुलुखमैदान आहे. पण दोघांचाही असंख्य श्रोत्यांशीं वारंवार संबंध येत असल्यामुळें व लोकांना लेखकाच्या वाङ्मयगुणांइतकेंच त्याच्या व्यक्तित्वाचेंही आकर्षण असल्या-मुळें मागच्या पिढींतल्या उत्कृष्ट साहित्यिकाला दुर्लभ असणारी लोक-प्रियता त्यांना व त्यांच्या बरोबरीच्या इतर लोकांना लाभली आहे.

या लोकप्रियतेचीं दृश्य चिन्हें म्हणजे कॉलेजांतल्या मराठी–वाङ्मय–मंडळांचे वार्षिक उत्सव आणि स्थानिक व प्रांतिक वाङ्मयसंमेलनें हीं होत. हे सर्व समारंभ–उत्सव अथवा स्नेहसंमेलनें या दृष्टीनें पाहिलें तर–अत्यंत यशस्वी होतात. पण मराठी वाङ्मयाच्या प्रगतीला साहाय्य करण्याचा त्यांचा जो मूळ हेतु असतो, तो कितपत सिद्धीला जातो याविषयीं मात्र साशंकता वाटते.

आपण स्थानिक व प्रांतिक संमेलनांचीच गोष्ट घेऊं या. ( महाराष्ट्र-साहित्य-संमेलन ही कुठल्याही प्रांतिक संमेलनाची वाढविलेली आवृत्ति असल्यामुळें त्याच्याविषयीं निराळें लिहिण्याची जरूरी नाहीं ! ) या संमेल-

नाचा कार्यक्रम बहुधा दीड दिवसाचा असतो. पहिला अर्धा दिवस स्वागताध्यक्ष व अध्यक्ष यांचीं भाषणें व विषयनियामक कमिटीची निवड यांतच खर्च होतो. हा 'छापील' कार्यक्रम अनेकदां कंटाळवाणा होतो! पण त्यांत बदल करण्याचें मात्र कुणीच मनांत आणीत नाहीं. अध्यक्षानें आपलें भाषण आधीं लिहून काढायचें, संमेलनानें तें छापायचें, कार्यक्रमाच्या आरंभींच त्याच्या प्रती वाटायच्या आणि हातांतल्या छापील भाषणाबरहुकूम अध्यक्ष महाराज बोलताहेत कीं नाहीं याची परीक्षा घेत घेत आणि जांभया देत देत श्रोत्यांनीं तास सव्वातास बसायचें, असा हा कृत्रिम नाटकी प्रकार कुणाला स्फूर्तिदायक वाटणार? सहजस्फूर्त भाषणामध्यें श्रोत्यांना आकृष्ट करण्याचें जें सामर्थ्य असतें तें एखाद्या सुंदर निबंधाच्या वाचनांत कुठून व्यक्त होणार? शिवाय उत्तम लेखक हा उत्तम वाचक असतोच असें नाहीं! किंबहुना भाषणाइतकीच वाचन हीहि एक अवघड कला आहे आणि ती सर्वांनाच साध्य होत नाहीं. बडोद्याला काव्य-विभागाचे अध्यक्ष म्हणून माधवराव पटवर्धनांनीं आपलें जें भाषण वाचून दाखविलें त्याची प्रभावी स्मृति माझ्याप्रमाणें अनेकांच्या मनांत अद्यापिहि रेंगाळत असेल. त्या वाचनांत वक्तृत्व होतें तसें व्यक्तित्वहि होतें. त्यामुळें तें एखाद्या समयस्फूर्त-सुंदर भाषणाइतकें लोकांना परिणामकारक वाटलें. पण तलावांतल्या पाण्यांत वाहत्या नदीची गति दाखविण्याचा हा चमत्कार बहुतेकांना असाध्य असतो. अर्थात् संमेलनाच्या अध्यक्षाचें वाचन हें अनेकदां इन्स्पेक्टरपुढें विद्यार्थ्यानें केलेल्या वाचनाइतकेंच नीरस होतें.

या संग्रहांतल्या भाषणांचें मलाहि असेंच वाचन करावें लागलें आहे. या प्रत्येक भाषणाच्या वेळीं झालेली माझी त्रेधा—त्यांतले कांहीं प्रसंग स्वप्नांत दिसले तर अजूनहि मी दचकून जागा होईन! बडोदें येथें दूरध्वनिक्षेपकाचें नि माझें कांहीं केल्या जमेना. त्याची माझी पहिलीच सलामी होती ती! ध्वनिक्षेपकाच्या तोंडाला तोंड दिलें तरी त्याला राग येतो आणि आपण दुसरीकडे पाहूं लागलों तरी तो रुष्ट होतो, याची मला मुळींच कल्पना नव्हती त्या वेळीं. व्यवस्थापकांनीं त्याला खालीं केलें, वर केलें, पण त्याच्या उठाबशांचा उपयोग मला मुळींच झाला नाहीं. वाच-

तांना तोंड थोडें इकडे तिकडे झालें कीं एका बाजूहून माझ्या आवाजाचा इतका मोठा प्रतिध्वनि मला ऐकूं येई कीं आज आपल्या अंगांत कुठला राक्षस संचारला आहे, याविषयीं माझें मन विचार करूं लागे.

सोलापूरला समोर उभा राहणारा ध्वनिक्षेपक नसल्यामुळें एका हातांत ध्वनिक्षेपक व दुसऱ्या हातांत छापील भाषण घेऊन मी वाचनाची जी कसरत केली तिची आठवण झाली कीं अजून अंगाला घाम सुटतो! मडगांव, पुणें व मुंबई इथलें माझें वाचन साधारण बरें झालें. पण सोलापूरला काय किंवा मडगांव–मुंबईला काय, माझीं समारोपाचीं भाषणेंच लोकांना अधिक आवडलीं. यावरून योग्य तो बोध घेऊन मी गतवर्षी जमखिंडीला अध्यक्षीय भाषण लिहिलेंच नाहीं; आणि तें भाषण केवळ माझ्याच नव्हे, तर सर्व श्रोत्यांच्याहि दृष्टीनें आकर्षक झालें.

लिहिलेलें भाषण न वाचतां तें साभिनय पाठ म्हणून दाखविण्याचा विक्रम करणारे कांहीं लोक आहेत, ही गोष्ट मात्र येथें नमूद केली पाहिजे. बडोदें येथील १९३४ सालच्या संमेलनाचे अध्यक्ष श्री. ना. गो. चापेकर यांनीं आपल्या छापील भाषणाचीं पहिलीं सतरा अठरा पानें अक्षरशः बोलून दाखविलीं होतीं. पुढें कांहीं भाग गाळण्याचें ठरवून त्यांनीं छापील प्रतीचा आधार घेतला ही गोष्ट निराळी! १९३६ च्या बडोदें–प्रांतिक–संमेलनाचे अध्यक्ष अत्रे यांनींही आपलें लिहिलेलें लांबलचक सुंदर भाषण जणुं कांहीं तें समयस्फूर्त आहे अशा पद्धतीनें लोकांपुढें मांडलें होतें. गतवर्षी रत्नागिरीला गेलेले अनेक लोक मोठ्या कौतुकानें एकच गोष्ट सांगत असत– फडक्यांनीं भाषण केलें तें अगदीं छापल्याबरहुकूम! त्यांत कानामात्रेचा सुद्धां फरक नव्हता! अत्रे आणि फडके यांना हीं भाषणें तोंडपाठ करायला किती वेळ लागला असेल हें त्यांचें त्यांनाच ठाऊक! लिहिलेलें भाषण केवळ एकदोन वेळां वाचून त्यांनीं हा चमत्कार करून दाखविला असेल, तर त्यांची स्मरणशक्ति फार तीव्र आहे एवढाच निष्कर्ष त्यावरून निघेल. पण प्रत्येक संमेलनाचा अध्यक्ष असा एकपाठी असणें संभवत नाहीं हें उघड आहे.

या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे अध्यक्षाचें भाषण हा जो संमेलनांतला अतिशय महत्त्वाचा भाग तो सद्यःस्थितींत किती मामुली व परिणामशून्य

वाटतो याची कल्पना करतां येईल. यापेक्षां संमेलनाच्या अध्यक्षानें लहानसें प्रास्ताविक भाषण करून संमेलनाला सुरवात करावी, संमेलनामध्यें वादग्रस्त अशा अनेक विषयांची चर्चा व्हावी आणि त्या चर्चेचा विस्तृत समारोप हेंच अध्यक्षाचें मुख्य भाषण मानण्यांत यावें, अशी व्यवस्था झालेली बरी! अध्यक्षाचें भाषण शेवटीं ठेवण्याची कल्पना ज्यांना कशीशीच वाटेल, त्यांनीं आपल्या समाधानासाठीं त्याच्याकडून एखादा वाङ्मयचर्चात्मक निबंध आधीं लिहवून घ्यावा व तो छापून संमेलनांत वांटावा! पण छापील भाषणाच्या वाचनाचें नीरस नाटक मात्र कार्यक्रमांत असूं नये.

अध्यक्षीय भाषणाइतकेंच चर्चेचे विषय व वक्ते यांचेंही संमेलनांत महत्त्व आहे. एकाच स्थळावर अनेक मुलींच्या बापांनीं उड्या घालाव्या किंवा एकाच जागेसाठीं अनेक पदवीधरांनीं अर्ज करावे, त्याप्रमाणें वर्षानुवर्षें आमच्या अनेक संमेलनांना एकच चर्चेचा विषय पुरतो. ‘पुरोगामी वाङ्मय,’ ‘चित्रपट,’ ‘वाङ्मय व प्रचार’ (‘कला व जीवन’ या वादाचें नवें नांव), ‘वैयक्तिक टीका’ इत्यादि पांचदहा विषयांचें चर्वितचर्वण करण्यापलीकडे अजून आमची गतिच जात नाहीं. शेंकडों (प्रसंगीं हजारों) रुपये खर्च करून लोकांना वाङ्मयामृत पाजण्याकरितां संमेलनाची पाणपोई उघडली जाते. पण या पाणपोईवर आलेला प्रत्येक मनुष्य मनांत म्हणत असतो ‘इथें अमृत म्हणून जें आम्हांला पाजलें तें पाण्यासारखेंच लागत होतें कीं! मधून मधून सोडालिंबू प्याल्यासारखें वाटे हें खरें! पण—’

चर्चेच्या विषयांत जसें नावीन्य हवें, त्याप्रमाणें वक्त्यांतहि अभ्यास आणि वक्तृत्व हे दोन गुण—निदान पहिला—अवश्य हवा! श्राद्ध अडून राहतें म्हणून रस्त्यावर दिसेल त्या ब्राह्मणाला बोलावून आणून पाटावर बसविणारे यजमान असतात ना? संमेलनाचे चालक अनेकदां त्यांचें अनुकरण करतात. मौजेनें संमेलनाला आलेल्या स्त्रीपुरुषमंडळींतलीं जीं बोलकीं असतील, भिडेला बळी पडत असतील किंवा आपली विद्वत्ता अगर वेषभूषा यांचें प्रदर्शन करण्याची ज्यांना हौस असेल, त्यांना वेठीला धरून संमेलनांतल्या चर्चांची अनेकदां सजावट केली जाते. या कार्यक्रमानें आपली बौद्धिक क्षुधा तृप्त झाली नाहीं तरी मनमुराद फुकट करमणूक

व्हायला कांहीं हरकत नाहीं, अशा समजुतीनें श्रोतेहि ती चर्चा ऐकतात. चर्चेचा हा अनुभव लक्षांत घेतां कुठल्या तरी मिळमिळीत विषयापेक्षां अध्यक्षाच्या भाषणांत उपस्थित झालेल्या महत्त्वाच्या मुद्यांचाच ऊहापोह संमेलनांत होईल तर अधिक बरें असें वाटूं लागतें. गतवर्षी रत्नागिरीला प्रो. फडके यांनीं आपल्या भाषणांत नियतकालिकांच्या हीन अभिरुचीवर हल्ला चढविला. या प्रश्नाला वादविवादांत अतिशय रंगणाऱ्या दोन बाजू असूनहि संमेलनांत ज्या विषयांची चर्चा झाली ते 'मुक्तछंद' व 'चित्रपट' हे होते ! पुढें थोड्या दिवसांनीं माडखोलकरांच्या अध्यक्षतेखालीं जें शारदोपासक संमेलन भरलें त्यांतहि याच प्रकाराची पुनरावृत्ति झाली. अध्यक्ष महाराष्ट्रांत 'बौद्धिक अराजक' माजलें आहे म्हणून आक्रोश करीत असतांना आम्ही शांतपणानें टीकावाङ्मयाविषयीं चर्चा केली !

कुठलेंही संमेलन लेखक निर्माण करूं शकणार नाहीं हें उघड आहे. प्रत्येक प्रांतिक संमेलनानें कांहींतरी विधायक कार्यक्रम आंखावा हें म्हणणें प्रथमदर्शनीं सोपें दिसतें. पण राष्ट्रीय सभेचा विधायक कार्यक्रम जसा खादी–चरख्यापलीकडे जाऊं शकत नाहीं, त्याप्रमाणें साहित्यसंस्थांचा विधायक कार्यक्रमहि स्नेहभोजनें व कायम ठशाचीं संमेलनें यांच्या पलीकडे अद्यापि फारशी मजल मारूं शकत नाहीं. ठिकठिकाणच्या साहित्यसंस्था संघटित होऊन कांहीं अखंड कार्य करूं शकल्या तर तें इष्टच आहे. पण कुठल्याहि संस्थेतर्फे भरणाऱ्या साहित्यसंमेलनापुरतेंच बोलायचें तर त्या संमेलनानें लोकांचें बौद्धिक आलस्य दूर केलें पाहिजे, त्यांना उच्च वाङ्मयाच्या रसग्रहणाला अधिक समर्थ केलें पाहिजे, 'हिचे पुत्र आम्ही, हिचे पांग फेडूं' हे उद्गार रसिकांच्या तोंडांतून आपोआप बाहेर येतील अशा प्रकारचें भाषाप्रेम त्यानें जनतेच्या अन्तःकरणांत निर्माण केलें पाहिजे. हें साध्य व्हायला आजच्या आपल्या संमेलनविषयक कल्पनांत बरेच बदल करावे लागतील. अध्यक्षीय भाषण हा विद्वत्तापूर्ण निबंध न राहतां तें बुद्धीला आणि भावनांना चालना देणारें वक्तृत्व झालें पाहिजे, चर्चेच्या विषयांत नावीन्याबरोबरच सामान्य श्रोत्याला आकृष्ट करण्याचें सामर्थ्य आलें पाहिजे, सर्व चर्चा अधिकारी लोकांकडूनच झाली पाहिजे आणि संमेलनाला

हजर न राहूं शकलेल्या हजारों मराठी रसिकांना या बौद्धिक मेजवानीचा अंशतः तरी लाभ व्हावा म्हणून संमेलनांतलीं सर्व भाषणें लघुलेखकांकडून लिहवून घेऊन तीं वृत्तपत्रांत अक्षरशः प्रसिद्ध झालीं पाहिजेत.

कारण महत्त्वाचीं भाषणें अक्षरशः छापलीं गेलीं नाहींत तर प्रत्येक संमेलनानंतर चारदोन महिने अनेक वर्तमानपत्रांत बराचसा उलटसुलट मजकूर प्रसिद्ध होऊन मुख्य विषयाविषयीं वाचकांच्या मनांत गोंधळ मात्र निर्माण होईल. भाषणाचा गोळाबेरीज केलेला अहवाल अनेकदां संदिग्ध असतो. या संदिग्धपणाचा किंवा वक्त्याच्या अथवा अहवाललेखकाच्या नजरचुकीचा फायदा घेण्याकरितां टपून बसलेले विद्वान लोकहि विपुल असतात ! या बाबतींतला माझा गेल्याच महिन्यांतला अनुभव मोठा मनोरंजक आहे. कल्याणला माझें एक चित्रपटविषयक व्याख्यान झालें. त्यांत मूळ हस्तलिखित निर्दोष असूनहि छापखान्यांत कंपॉझिटरच्या प्रतापामुळें त्यांत ज्याप्रमाणें चुका होतात, त्याप्रमाणें चित्रपटकथा पडद्यावर आणतांना दिग्दर्शकाच्याही हातून तिच्यांत दोष निर्माण होतात असें सूचित करण्याच्या दृष्टीनें मी कांहीं वाक्यें बोलून गेलों. ही तुलना एका विशिष्ट गोष्टीपुरतीच आहे हें श्रोत्यांना बजावून सांगण्याची जरूरी मला वाटली नाहीं. मर्यादित वेळेंत माझे विविध विचार मला श्रोत्यांपुढें मांडावयाचे असल्यामुळें प्रत्येक लहानसहान विधानाच्या दोन्ही बाजू अथवा प्रत्येक तुलनेच्या स्पष्ट मर्यादा चित्रित करायला मला सवडहि नव्हती. या व्याख्यानाचा सारांशहि प्रसिद्ध होण्यापूर्वी माझ्या नजरेखालून गेला नाहीं. मात्र एका लेखकांनीं स्तंभांतून आणि दुसऱ्या एका दिग्दर्शकांनीं कंसांतून खांडेकराचा मूर्खपणा लोकांपुढें मांडण्याकरितां ‘दिग्दर्शक म्हणजे नुसता कंपॉझिटर आहे!’ हें माझें सिद्धांतवाक्य असल्याचा कांगावा करून जेव्हां माझ्यावर टीका केली, तेव्हां कुठें मी जागा झालों ! विशेष नवलाची गोष्ट ही कीं ज्या लेखक–दिग्दर्शकांनीं मी · हें वाक्य अगदीं ठांसून बोललों असें गृहीत धरलें त्या दोघांनाहि मी लेखकाला ज्याप्रमाणें शब्दसृष्टीचा त्याप्रमाणें दिग्दर्शकाला चित्रसृष्टीचा ईश्वर मानतों हें पुरेंपूर ठाऊक आहे. पण–ही ठाऊक असलेली गोष्ट ते सोईस्करपणानें विसरले नसते तर खांडेकराचा मुखामुखी उपहास करण्याची संधि त्यांना कशी मिळाली असती ?

नावडतीच्या अळणी मिठाविषयीं उलटसुलट चर्चा करण्यांतच सध्यांच्या लेखकांची शक्ति आणि वर्तमानपत्रांची जागा खर्ची पडत आहे ! उद्यां साहित्य-संमेलनांतल्या महत्त्वाच्या भाषणांतून आणि चर्चेतून असले शुष्क आणि नळावरल्या आडाणी बायकांच्या भांडणांशीं स्पर्धा करणारे वाद-विवाद बाहेर पडूं नयेत म्हणूनच मी लघुलेखकांकडून भाषणें टिपून घेण्याची सूचना मुद्दाम वर केली आहे.

हीं पांच अध्यक्षीय भाषणें—पांच लहानमोठीं फुलें—सुवासिक आहेत असें नाहीं. पण माझ्यावर अखंड प्रेम करून ज्या महाराष्ट्रीय रसिकांनीं एका खेड्यांतल्या शाळामास्तराला साहित्यपर्वताची बिकट चढण चढायला प्रोत्साहन दिलें, त्यांनाच तीं अर्पण करण्यांत एक प्रकारचें औचित्य आहे. नाहीं का ?

खासबाग, कोल्हापूर.
२३।१।१९४१

वि. स. खांडेकर

# मराठी साहित्यसंमेलन, बडोदें

## सन १९३४

## अधिवेशन एकोणिसावें

### कथाविभाग

## सन्मान्य अध्यक्ष व थोर सभाजन हो,

यंदाच्या साहित्यसंमेलनांतील हें अध्यक्षस्थान मी जितक्या आनंदानें तितक्याच साशंकतेनें स्वीकारीत आहे. अर्थात् यांतील आनंदाचें श्रेय जसें आपणां सर्वांना, तशी साशंकतेची जबाबदारी सर्वस्वीं माझ्यावर आहे, हें सांगायला नकोच. वय व वाङ्मयकर्तृत्व या दोन्ही दृष्टींनीं लहान असलेला माझ्यासारखा कथालेखक आणि जनसमाजाला आपल्या जादूनें मुग्ध करून सोडणाऱ्या कथावाङ्मयासारख्या साहित्यविभागाचें अध्यक्षस्थान ! कुठें माडाचें चुडत आणि कुठें लक्ष्मीविलास राजवाडा ! केवळ आपल्या माझ्यावरील उत्कट प्रेमामुळें आज तें चुडत या स्थानीं बसत आहे, त्याची मला पूर्ण जाणीव आहे. गेलीं सतरा-अठरा वर्षे मीं गोमंतकाच्या सान्निध्यांत काढलीं. त्यामुळें लॉटरी उघडल्याबरोबर माणसांचीं नशिबें उघडल्याच्या नातम्या वारंवार माझ्या कानांवर पडल्या आहेत. पण त्या लहरी लक्ष्मीच्या लॉटरीचें एक रुपयाचें तिकीट काढण्याचा अजूनहि मला धीर झालेला नाहीं. वाटतें—रुपया देऊन सोळा आणे फजिती करून घेण्यांत काय हंशील आहे ? पण पंधरा वर्षांपूर्वी पोरसवदा हौसेनें सरस्वतीदेवीनें मंजूर केलेल्या सोडतींतील एक तिकीट मात्र मीं काढलें. त्या तिकीटाला

आजच्या अध्यक्षस्थानाइतकें मोठें बक्षिस कधीं काळीं मिळेल, अशी त्या वेळीं मला स्वप्नांतहि कल्पना आली नव्हती. येणार तरी कुठून ? तेव्हां जीं स्वप्नें पडत त्यांत मासिकांच्या संपादकांचे नाटकांतील खल-पुरुषासारखे दिसणारे चेहरे व त्यांनीं केराच्या टोपल्यांत फेंकून दिलेल्या माझ्या कविता याच गोष्टी प्रामुख्यानें असत !

**संशयरत्नमाला**

माझ्याहून ज्येष्ठ व श्रेष्ठ असे प्रो. वा. म. जोशी, डॉ. केतकर, श्री. गुर्जर, वरेरकर, प्रो. फडके प्रभृति अनेक कथालेखक महाराष्ट्रांत आहेत. पण जोशी–केतकरांनीं मोठ्या संमेलनाचें अध्यक्षस्थान भूषित केलेलें. देवाला वाहिलेल्या फुलाचा वास घेण्याकडे उपयोग कोण करणार ? त्यांतून कथाविभागाचें अधिवेशन यंदांच पहिल्यानें होत आहे. क्रिकेटमधें कॅप्टन अगर उत्कृष्ट खेळाडू यांना खेळाच्या तोंडीं देत नाहींत. आमच्या कथालेखकचमूंतील कॅप्टन प्रो. फडके व टोलेबाजी करणारे डावखुरे वरेरकर यांना मागें ठेवून मला पुढें करण्यांतहि बहुधा आपली हीच दूरदृष्टि असावी. सापाकडून चावून घेण्याची जी दुष्ट खोड मला जडली आहे व वर्तमानपत्रांच्या कृपेनें जी जगजाहीर झाली आहे, तीही कदाचित् याच्या मुळाशीं असेल. कारण कांहींही असो, ही संशयरत्नमाला इथेंच गुंडाळून ठेवून आपल्या माझ्यावरील निरतिशय प्रेमाबद्दल मी आपले मनःपूर्वक आभार मानतों.

आपण मला दिलेला हा मान पाहून ज्यांच्या डोळ्यांत आनंदाश्रु उभे राहिले असते, ते गुरुवर्य श्रीपाद कृष्ण कोल्हटकर आज इथेंच नव्हे, तर इहलोकांतहि नाहींत, ही गोष्ट माझ्याइतकीच आपणांलाहि जाणवेल, असें मला वाटतें. ‘बबीची तयारी’ या त्यांच्या छोट्या गोष्टींतील लहानग्या बबीसारखी माझी स्थिति झाली आहे. आजोबांनीं बबीला दिलेल्या सुंदर खेळण्यांप्रमाणें कोल्हटकरांनीं दाखविलेल्या मार्गानें जाऊन मलाहि शारदो-पासनेचीं मधुर फळें मिळत आहेत. पण बबीच्या त्या खेळण्यांनीं आजो-बांची चिरनिद्रा जशी भंग पावूं शकली नाहीं, त्याप्रमाणें या मधुर फळांचा रस तात्यासाहेबांना काळनदीच्या ऐलतीरावर आकर्षून आणूं शकणार नाहीं. त्यांच्या पूज्य चरणीं कृतज्ञतेचे अश्रू वाहून मी माझ्या कामाकडे वळतों.

## कथावाङ्मयाचा आढावा

हें काम मात्र अत्यंत आनंदाचें आहे. माझ्यासारख्या कथाप्रदेशाच्या कुळकर्ण्याला 'तुझ्या भागांत यंदां कसं काय पीक आहे?' असा प्रश्न सरस्वती-देवी करणारच. या प्रश्नाचें उत्तर म्हणून 'खोटा रपोट' करण्याचें मला मुळींच कारण नाहीं, यापेक्षां अधिक आनंदाची गोष्ट दुसरी कोणती असूं शकेल? 'सोळा आणे पिकलंय् यंदां!' असें अभिमानानें सांगून त्या पिकाचा तपशीलच मी हजर करतों.

कथाक्षेत्रांतील मुख्य पिकें दोन–जिराइती म्हणजे कादंबऱ्या आणि बागायती म्हणजे लघुकथा व गोष्टी. चालू वर्षीं गेल्या कित्येक वर्षांपेक्षां अधिक कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या. एवढेंच नव्हे–तर वैचित्र्य व वाङ्मय-गुण या दृष्टींनींहि त्या डोळयांत भरण्याजोग्या आहेत. साठी उलटलेल्या अगर तिच्याकडे झुकलेल्या केळकर–जोशी–वरेरकरांपासून तिशीच्या आंत-बाहेर असलेल्या दिवाकर कृष्ण, गांगल, विभावरी शिरूरकर प्रभृति (विभा-वरीबाईंचें वय मी सांगत आहे; अर्थात् त्यांची माझी खूपच ओळख असली पाहिजे असा तर्क लढवून वर्तमानपत्रांचे बातमीदार माझ्यावर मुलाखतीचा मारा करतील हें मी जाणून आहे!) लेखकांनीं यंदां कादं-बरीला करभार दिला आहे. वार्धक्यांत तरुणांची तडफ दाखविणाऱ्या वरेरकरांपासून तारुण्यांत प्रौढांचें गांभीर्य दाखविणाऱ्या य. कृ. खाडिल-करांपर्यंत विविध मनोवृत्तींचे लेखक या कादंबरीकारांत आहेत.

श्री. तात्यासाहेब केळकरांवर मराठी कादंबरी रागावलीच होती. तिनें तरी कां रागावूं नये? एखाद्या भावानें सात आठ बहिणींना बहुमोलाची ओवाळणी घालून एखादीलाच वगळलें तर तिला राग आल्याशिवाय राहील का? ती दरिद्री अगर स्वभावानें वाईट असती तर गोष्ट निराळी. पण बोलून चालून कादंबरी ती! केळकरांनीं तिचा फार वर्षांचा राग लक्षांत घेऊन तिच्या तबकांत यंदां संस्थानिकच घातला हें ठीक झालें! दिवाकर कृष्णांची लेखनकलिका म्हणजे जणुं कांहीं किशोरीचें हृदयच! ती फार वर्षांनीं यंदांच उमलली! 'सुशीलेच्या देवा'नंतर 'इंदु काळे व सरला भोळे' या दीड देवतांचें (पहिली अर्धी व दुसरी संपूर्ण) पूजनही प्रो. वा.

म. जोशी यांनीं याच वर्षी केलें. विभावरीबाईनीं वाचकांना ' हिंदोळ्यावर ' बसवून दिलेले झोंके तर अगदीं ताजे आहेत. शिखरे, गांगल, निरंतर प्रथमतःच कादंबरीक्षेत्रांत पदक्षेप करीत आहेत. उलट, बेहरे, हडप, कु. प्रभावळकर प्रभृतींना या क्षेत्रांतील मार्ग सुपरिचित आहे. गेल्या दशकांतील अत्यंत लोकप्रिय कादंबरीकार प्रो. फडके यांचें नांव या यादींत नाहीं असें पाहून वसुलाचा हिशेब घेणाऱ्या सरस्वतीदेवीला चुकल्या-चुकल्यासारखें वाटलें असतें. गेलीं दहा वर्षें सोनें पिकविणारी ही जमीन यंदां पड राहिली म्हणून सांगावें तर तिचा विश्वाससुद्धां बसला नसता असल्या गोष्टीवर. सुदैवानें तसें सांगण्याचें कारण राहिलें नाहीं. प्रो. फडके यांची स्त्री–जीवनांतील एका महत्त्वाच्या विषयावरील कादंबरी ' किर्लोस्कर ' मध्यें नुक्तीच सुरू झाली आहे.

## कथावाङ्मयांतील वैचित्र्य

या विविध कादंबऱ्यांच्या अंतरंगाकडे वळलें तरीही हेंच चमत्कृतिपूर्ण वैचित्र्य अनुभवाला येईल. वरेरकर वाचकांना गिरणीची हवा खायला नेत आहेत, तर केळकर त्यांना संस्थानांत सहल करायला लावीत आहेत. एकीकडे वामनराव जोशी गांधींचें शिष्यत्व पतकरलेल्या विनायकराव भोळ्यांच्या आयुष्याची करुणरम्य कथा सांगत आहेत, तर दुसरीकडे शिखरे देशभक्तीच्या पायीं प्रणयिनीचा हात झिडकारणाऱ्या एका कॉलेजकुमाराच्या आयुष्याचें वर्णन करीत आहेत. 'सदानंद'कर्ते खाडिलकर विवाहित पत्नीला सोडून परस्त्रीवर लुब्ध होणाऱ्या नायकाच्या चित्रणांत गुंग ! उलट ' किशोरीच्या हृदयां 'त हिराशीं चोरटा प्रेमसंबंध ठेवूनही किशोरीला आपली पत्नी करूं इच्छिणारा नायक रंगविण्यांत दिवाकर कृष्ण दंग ! राजकीय काय अगर सामाजिक काय, दोन्ही प्रकारच्या कथाचित्रांत अद्‌भुत अनुभव मुळींच नाहींत असें नाहीं. केळकरांच्या कादंबरीचा संस्थानिक नायक राज्यदानाला तयार झालेला दिसतो, तर विभावरीबाईंची अचला केवळ मातृपदाकरितां विरागाशीं संबंध ठेवीत असलेली आढळते. हे टोले मोठे असले तरी चारांचेच आहेत. पण ' नंदनवनांत ' या कादंबरीच्या लेखकानें प्रेमळ पतिपत्नींचें जोडपें रंगवून त्यांतील पतीला जी दुसरी स्त्री

आवडूं लागते, तिला सवत म्हणून पत्नी मोठ्या आनंदानें घरांत आणते, असें दाखविलें आहे! जग पूर्णत्वाकडे चाललें आहे हेंच खरें! प्रणय-विषयक औदार्याचें सारें श्रेय अशा रीतीनें स्त्रीजातीकडे जात असलेलें पाहूनच कीं काय वसुंधराकर्ते रांगणेकर यांनीं 'सीमोल्लंघनां'त पति व प्रियकर या दोघांच्याही सहवाससुखाचा लाभ घेणारी नायिका रंगविण्याची घोषणा केली. 'बहुरत्ना वसुंधरा!' दुसरें काय?

## पण हा संधिवात नव्हे!

कलागुणांच्या दृष्टीनेंही या कादंबऱ्या कांहीं कमी विविध नाहींत. केळकरांनीं हरिभाऊंच्या वेळीं रूढ असलेल्या धोपट कथापद्धतीचा अवलंब केला आहे, तर वामनराव जोशांनीं पत्रांचा आश्रय करून आपल्या कादंबरीला नावीन्यपूर्ण रम्यता आणिली आहे. 'आंसवांची माळ,' 'हिंदोळ्यावर,' 'इंदु काळे व सरला भोळे,' 'थोरली आई' इत्यादि कादंबऱ्यांकडे पाहिलें, म्हणजे कादंबऱ्यांचा कल हातपाय आखडण्याकडे होऊं लागला आहे असें दिसून येईल. पण हा संधिवात नाहीं हें खास! 'परत-भेट' व 'किशोरीचें हृदय' या वरील कादंबऱ्यांपेक्षां मोठ्या आहेत. पण लहान मुलांचें जेवण मोठ्या माणसाच्या न्याहारीला पुरतांना मारामार होते, हा अनुभव मागच्या पिढीला त्यांनाहि आला असता. एवढ्या पृष्ठसंख्येंत हरिभाऊंच्या कथानकानें मध्यसुद्धां गांठला नसता. ही अल्पविस्तार पद्धति वाईटच आहे असें मी म्हणत नाहीं. अंगांत घालायच्या कोटापासून जगांत काढायच्या दिवसांपर्यंत सर्वच गोष्टी सध्यां लहान होऊं लागल्या आहेत! तिथें बिचाऱ्या कादंबरीनें मोठें रहावें असें म्हणण्यात हंशील काय? पण लघुकादंबरी म्हणजे मुग्धावस्थेंतील कुमारिका, आजारीपणामुळें लहान दिसणारी लेंकुरवाळी बाई नव्हे, हें या पद्धतीनें लिहिणारांनीं लक्षांत ठेवलें पाहिजे. पात्रें, कथानक, स्वभावविकास इत्यादि गोष्टींत लघुकादंबरी कादंबरीहून बरीच भिन्न आहे. या भिन्नतेकडे दुर्लक्ष झालें म्हणजे केळीच्या झाडाला नारळ' लागल्याचें अद्भुत दृश्य दृष्टीस पडतें. स्टीफेन झ्वाइग या पाश्चात्य कथालेखकाच्या लघुकादंबऱ्या या दृष्टीनें अभ्यसनीय आहेत. 'हिंदोळ्यावर' व 'इंदू काळे आणि सरला

भोळे' या विशिष्ट दृष्टीनें अधिक सरस ठरतील.

कथावाङ्मय हा कांहीं राक्षसी आरसा नव्हे, कीं त्यांत समाजाच्या सर्व सूक्ष्म हालचालींचें यथार्थ प्रतिबिंब पडेल. पण त्याचप्रमाणें कथावाङ्मय म्हणजे कांहीं नुसता संगमरवर नव्हे. विविध लेखकांच्या बहुविध अनुभव-प्रवाहांच्या या संगमांत जीवनाचें प्रतिबिंब नेहमींच पडतें. पण तें आरशांतल्याइतकें स्पष्ट असत नाहीं. रंजन, कला, ध्येय, व्यक्तिवैचित्र्य इत्यादि लाटांमुळें हें प्रतिबिंब निरनिराळे आकार धारण करतें. कादंबरीवाङ्मयांत पुसट दिसणाऱ्या अशा प्रतिबिंबांवरून १९३४ च्या आपल्या सामाजिक जीवनाची कल्पना कुणी तिऱ्हाइतानें केली, तर विवाहाचें वैषम्य व प्रणयाचा पुरस्कार हेच समाजापुढील महत्त्वाचे प्रश्न आहेत, असें त्याला निःसंशय वाटेल. वस्तुस्थिति तशी आहे कीं काय हें सांगायलाच नको ! हातच्या कांकणाला इतर देशांत कदाचित् आरसा लागत असेल ! पण आमच्या देशांत सध्यां तरी या प्रदर्शनाकरितां आरशाची जरूरी नाहीं.

## लघुकथांची बागाईत

उत्पन्नाच्या दृष्टीनें लघुकथांची बागाईत यंदां बरी आहे. नियतकालिकांतून प्रसिद्ध होणाऱ्या लघुकथालेखकांची संख्या पाहून सध्यांच्या मंदीच्या काळांत जिझियाकरासारखा एखादा लघुकथाकर सरकारनें बसविल्यास बरें होईल, असेंसुद्धां एखाद्या वाङ्मयप्रेमी कलेक्टराला वाटण्याचा संभव आहे; पण नियतकालिकांतून प्रसिद्ध होणाऱ्या कथा म्हणजे पावसाचें पाणी. रंजनाचा ओलावा त्यांच्यामुळें मिळतो खरा; परंतु तहानेच्यावेळीं प्यायचें थंडगार सुवासिक पाणी म्हणून त्याचा कांहीं उपयोग नाहीं. कथासंग्रहांनींच तें काम होऊं शकतें. सौ. शिर्के व श्री. य. गो. जोशी यांनीं कथासंग्रहाच्या रूपानें यंदां वाचकांची पुनर्भेट घेतली असून, कृष्णाबाई, नाट्यछटाकार दिवाकर, बोकील, सहस्रबुद्धे, प्रो. फडके, प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई प्रभृति अनेक कुशल लघुकथालेखक तर संग्रहरूपानें वाचकांना प्रथमच भेटत आहेत. या संग्रहांत ' लपलेल्या खडका 'पासून ' कल्पवृक्षाच्या छाये 'पर्यंत वाचकाला कुठेंही आरामानें बसतां येईल. 'मानसलहरी'प्रमाणेंच ' वळवाचे पाऊस'ही त्याला शीतल व सुखकारक वाटतील. या कथांत कापडाच्या दुकानांत

दिसलेली बाई पुन्हां भेटतांच ज्याची कादंबरीलेखनाची प्रतिभा पल्लवित होते अशा फडक्यांच्या नायकाच्या मांडीला मांडी लावून आपल्या प्रेमाला विरोध नाहीं या दुःखानें बेशुद्ध पडणारा य. गो. जोशांचा नायकहि आहे. सहस्रबुद्ध्यांच्या गोष्टी वाचतांना सामाजिक अन्यायांचे लपलेले खडक सुरुंग लावून कसे फोडतां येतील, ही मतपरिवर्तनाची तीव्र दृष्टि दिसते, तर 'मानसलहरींत', 'कल्पवृक्षांच्या छायें'त आणि प्रो. फडके यांच्या गोष्टींत कलेचें व 'वळवाच्या पावसां'त विनोदाचें नृत्य आढळतें. महाराष्ट्रलघुकथेला 'मोत्यांचीं कुडीं' देऊन दौंडकरांनीं व 'रशना' देऊन कुमारी आनंदकरांनीं नुक्तेंच शृंगारलें आहे. कोंकणच्या ब्रव्यांनीं तर हिंवाळ्यांतच वाचकांना 'कलमी आंबे' दिले आहेत. याशिवाय पुरोहित, जयवंतराव सरदेसाई, नारायणराव कुलकर्णी, कुमार रघुवीर यांचेही संग्रह प्रसिद्ध झाले आहेत. हे संग्रह लेखकाची मनोवृत्ति, रचनाकौशल्य, भाषा इत्यादिकांत एकमेकांहून कितीही भिन्न असले, तरी त्या सर्वांचा गुच्छ सुगंधी व रमणीयच आहे यांत शंका नाहीं. प्रत्येक संग्रहांत अशी एक तरी गोष्ट आढळेल कीं, 'मराठींतील निवडक गोष्टी' म्हणून एखादा कोशाशीं स्पर्धा करणारा कथासंग्रह काढा-यचें कुणी धाडशी प्रकाशकानें ठरविलेंच, तर तिचा त्यांत सहज समावेश होऊं शकेल.

या व्याहीविहिणींच्याबरोबरच इष्टमित्रांचा, नियतकालिकांतील लघु-कथालेखकांचा—समाचार घेणें अवश्य आहे. मनोरंजनाकरितां निघालेलीं मासिकें व नियतकालिकें तर राहूंच द्यात, पण भविष्यापासून विम्यापर्यंतच्या विविध विषयांना वाहिलेल्या नियतकालिकांचे अंकही गोष्टीवांचून सध्यां छापखान्याच्याबाहेर पडूं शकत नाहींत. लघुकथारूपी फुलपांखरांनीं 'केसरीच्या' आयाळीवर विहार करावा हें कालमाहात्म्यच नव्हे का? शारदेमध्यें म्हातारा भुजंगनाथ 'आम्ही आहोंत तोंपर्यंत आम्हांला बायको ही पाहिजेच' असें कोंदडाला ठांसून सांगतो. मराठी नियतकालिकांची स्थिति या म्हाताऱ्या भुजंगनाथासारखी झाली आहे. ह्यांना लघुकथारूपी कुटुंब हें हवेंच. मग त्या कुटुंबानें रंगरूप कसेंहि असलें तरी चालेल.

प्रसंगीं विमाविषयक नियतकालिकांतील कसल्याही गोष्टीच्या नायिकेचें नांव विमल उर्फ विमा ठेवलें म्हणजे लघुकथेच्या या बादरायणसंबंधाचें समर्थन होऊं शकेल !

## कथावाङ्मयाचा हिणकसपणा

अशा रीतीनें मराठी नियतकालिकांतून बाहेर पडणाऱ्या गोष्टींना कला व वाङ्मय यांचा कस लावला तर हाताच्या बोटांवर मोजण्याइतक्यासुद्धां चांगल्या गोष्टी सांपडणार नाहींत, ही टीका कांहीं अगदींच खोटी नाहीं. पण केवळ संख्येच्या दृष्टीनें पाहिलें तर त्या मोजायला सहस्रार्जुनाच्या हाताचीं बोटेंही पुरीं पडणार नाहींत. एका दृष्टीनें हें बरोबरच आहे. आंब्याच्या झाडाला मोहराच्या मानानें फळें कधींच लागत नाहींत. नियतकालिकाच्या लेखकवर्गांत होतकरू आणि हौशी माणसांचा मोठा भरणा असतो. पण लोकलगाड्यांत प्रवास करणारा गाडींत चढून जागा पकडतो न पकडतो तोंपर्यंतच जशी त्याची उतरायची वेळ होते, त्याप्रमाणें हौशी लेखकाच्या लेखणीची स्थिति असते ! असा प्रवासी बाड-बिछायतीची कदर कशाला करील ? वाचन, मनन, अभ्यासपूर्वक केलेला कलाविकास इत्यादिकांचें अवजड ओझें अशा हौशी लेखकापाशीं क्वचितच् दृष्टीला पडतें. तथापि अशा लेखकांचें लेखन पूर्वीपेक्षां अधिक विविध होत आहे, ही आनंदाची गोष्ट होय. या सर्व हौशी लघुकथालेखकांचीं नांवें सांगूं लागल्यास विष्णुसहस्रनाम वाचल्याचें पुण्य माझ्या पदरांत सहज पडेल. थोडीशीं निवडक नांवें घेतलीं तरी या पूजेला संध्येचें स्वरूप प्राप्त होईल. तेव्हां या फंदांत न पडतां आजच्या सैनिकांतूनच उद्यांचे सेनापति निर्माण होतात या जाणीवेनें या हौशी लेखकांना सामुदायिक नमस्कार करूनच मी पुढें जातों.

यंदांच्या पीकपाण्याचा हा त्रोटक अहवाल झाला. पण समाजाची सुस्थिति एका वर्षाच्या दुष्काळावर अगर सुकाळावर थोडीच अवलंबून असते ! वाङ्मयाचेंही तसेंच आहे. यंदां पुष्कळ कथासंग्रह प्रसिद्ध झाले असले तरी त्यांतील कथा अनेक वर्षांच्या परिश्रमाचीं फळें आहेत. कादंबऱ्यांची संख्या तर तिच्या कुंडलींतल्या अनुकूल ग्रहामुळेंच वाढली आहे,

असा फलज्योतिषावर विश्वास ठेवणारांचा समज व्हायचा ! अशा परिस्थितींत मराठी कथावाङ्मयाकडे भूतभविष्याच्या व्यापक दृष्टीनें ओझरती नजर टाकणें आवश्यक आहे.

## या पुराला भिऊं नका

'या गोष्टींनीं आणि कादंबऱ्यांनीं विटविलें' असें म्हणणारीं माणसें आहेत ! नाहीं असें नाहीं. पण त्यांचें समाधान ब्रह्मदेवदेखील करूं शकेल कीं नाहीं, याची शंकाच आहे. बिचारा ब्रह्मदेव पडला वेदपठन करणारा ! आणि वेदांत तर पुष्कळच कथा आहेत. या आक्षेपकांना वाटतें, कथावाङ्मयाला भयंकर पूर आला आहे, शृंगारामुळें त्याचें पाणी गढूळलें आहे, मधूनमधून नवविचारांचे सर्पही या पुराबरोबर वाहत येत आहेत ! तीरावरील धार्मिक खेडींपाडीं आणि त्यांत राहणारीं नीतिमान माणसें यांची कांहीं आतां धडगत दिसत नाहीं. हा पूर लवकर ओसरण्याचें लक्षण दिसत नसल्यामुळें जलप्रलयाच्या वेळीं जसा फंड उभारतात, त्याप्रमाणें कांहीं तरी योजना झटपट होणें जरूर आहे. समाजाची काळजी वाहणाऱ्या या सर्व लोकांना मी नम्रतापूर्वक एवढेंच सांगतों कीं, पात्रांतील पाणी थोडेंसें वाढूं लागल्याबरोबर पुराचा बागुलबोवा उभा करण्यापासून फायदा काय? नदीच्या पात्राप्रमाणें वाङ्मयालाही सामान्यतः मर्यादा असतातच. त्या मर्यादेचें उल्लंघन एखादेवेळीं होत असेल; पण पुरानें केलेलें नुकसान व पाण्यानें पिकविलेलीं शेतें यांचें प्रमाण मांडलें, तर पूर ही अपरिहार्य आपत्ति म्हणून तिचा स्वीकार करणेंच योग्य ठरणार नाहीं का?

आठवड्यांतील सहा दिवस कामाच्या घाण्याला जुंपलेला कारकून शनिवारीं संध्याकाळीं वाचनालयांतून एखादी कादंबरी घेऊन आला, तर ती त्याच्या हातांतून हिसकावून घेऊन त्याला शनिमाहात्म्य वाचायला देणें धार्मिकपणाचें असेल ! पण शहाणपणाचें खास होणार नाहीं. कथावाङ्मयावर वाचकांच्या उड्या पडतात त्या रंजनासाठीं. त्यांत गहन धर्मतत्त्वें नाहींत, प्रचंड ज्ञानपर्वत नाहींत, अफाट विज्ञानसागर नाहींत, परलोकाला लागणारी उंच शिडी नाहीं, हें त्यांना कळत नाहीं का? पण संसारतापानें

तापलेल्या व तहानेनें व्याकुळ झालेल्या सामान्य मनुष्याला रम्य काल्पनिक कथांचें शीतल पेयच हवें. व्हिटॅमिन्सनीं परिपूर्ण असलेल्या जड ज्ञानान्नाचा त्याला काय उपयोग आहे? सकाळपासून संसाराला जुंपून घेऊन तिसऱ्या प्रहरीं घटकाभर अंग टेकणाऱ्या सर्वसामान्य गृहिणीला एखादा गोष्टींच्या मासिकाचा अंक दिला, तर ती तो उघडून तरी पाहील. 'अधिकस्य अधिकं फलं' या न्यायानें ज्ञानकोशाचा एखादा विभाग या वेळीं तिच्या हवालीं केल्यास ती त्याचा उशीदाखल उपयोग करील हेंच अधिक संभवनीय नाहीं का?

## कथावाङ्मयाचें उद्दिष्ट

कथावाङ्मय हें मुख्यतः बहुजनसमाजासाठीं, मानवी हृदयाशीं क्रीडा करण्यासाठीं जन्माला येतें. क्रीडेंत व्यायाम होतो; पण तो नकळत. हरिभाऊ आपट्यांनीं कादंबऱ्या लिहिल्या, त्या कांहीं रानडे–टिळक–गोखले–आगरकर अशा मंडळीकरतां नव्हेत. हालाहाल जसें शंकरानेंच पचवावें अगर शिवधनुष्य जसें रामानेंच उचलावें, त्याप्रमाणें समाजांतील अत्यंत अल्पसंख्याक बुद्धिवान वर्ग शुद्ध ज्ञानसंवर्धनाच्या अगर त्याच्यासारख्या इतर कठीण व्यवसायांत गढलेला असतोच; पण गिरिकंदरांत तपश्चर्या करणाऱ्या मूठभर ऋषींकडे पाहून संसार असार ठरविण्यांत मतलब काय? बहुजनसमाज बालकासारखा असतो. त्याला खेळीमेळीनें सांगितलेल्या गोष्टीच सर्वांत अधिक आवडतात. मनुष्यमात्राची ही प्रवृत्ति प्राचीन काळापासून चालत आली आहे. धर्मग्रंथ म्हणून आपण जें अत्यंत पूज्य मानतों तें वैदिक व पौराणिक वाङ्मय मुख्यतः कथात्मकच नाहीं का? बायबलांत खिस्तानें रूपककथांच्या द्वारानें केलेल्या उपदेशांचीं उदाहरणें अनेक आढळतील. कथात्मक वाङ्मय उदात्त भावनांचा परिपोष करणारें असावें असें म्हणणें निराळें आणि शेतांत उगवणाऱ्या गवताप्रमाणें तें निरुपयोगी आहे असें म्हणणें निराळें. धान्याला गवत मानणारांना काय म्हणावयाचें?

ज्ञानप्रधान वाङ्मय हें पाणीदार मोत्यांसारखें असतें; (मोत्यें खोटींही असूं शकतात अगर प्रसंगीं वेजीं उतरतात ही गोष्ट अलाहिदा!) रंजन-

प्रधान वाङ्मयाची त्याच्याशीं तुलना करून त्याला फळाफुलाची उपमा कुणीं दिली, तर त्याबद्दल कुणाला वाईट वाटणार नाहीं. पण या फुलांचा सुगंध मोत्यांपासून कसा मिळणार ? मोत्यांचें पाणी कितीही चांगलें असलें, तरी फळांचा रस तीं कुठून देणार ? शिवाय या फळांफुलांत कधींकधीं कल्पवृक्षाचीं फुलें व अमृतफळें असतात हेंही विसरतां कामा नये.

## कथावाङ्मयाची शक्ति ओळखा

देशाचें पारतंत्र्य, समाजाची परिस्थिति अगर शिक्षणाचा प्रसार याचें कथावाङ्मयाशीं त्रैराशिक मांडणेंच मुळांत चूक आहे. या गोष्टींनीं कथा-वाङ्मयाचें स्वरूप बदलेल; पण त्याच्या निर्मितीच्या प्रमाणांत काडी-मात्रही फरक होणार नाहीं. इंग्लंड, अमेरिका अगर रशिया या देशांकडे पाहिलें तर तेथील कथावाङ्मयांत निर्झरिणींच्या नद्या व नद्यांचे समुद्र झालेले दिसत आहेत. शिक्षणाचा भरपूर प्रसार झालेल्या देशांतही कथा-वाङ्मय वाढत्या प्रमाणावरच निर्माण होत आहे. मग शिक्षणाचें अत्यंत अल्पप्रमाण असलेल्या व त्यामुळें बहुजनसमाजाचें बालकाशीं अधिक साम्य असलेल्या आपल्या देशांत त्याची विशेष जरूरी आहे, हें सांगायला कांहीं ज्योतिःशास्त्रज्ञाची अगर नीतिशास्त्रज्ञाची जरूरी नाहीं. गेल्या तीन चार पिढ्यांतील रशियन कथालेखक अगर अप्टन् सिंक्लेअर आणि सिंक्लेअर लुई यांच्यासारखे अमेरिकन कथालेखक पाहिले कीं कथावाङ्मयाची शक्ति निर्भेळ उपयुक्ततावाद्यांनाहि कळून येईल.

कथावाङ्मय सहेतुक असावें कीं असू नये या मुद्यावर आपल्याकडे रणें सुरू आहेत. निःशस्त्र लोकांचीं युद्धें म्हणजे दिवाणी दावे ! कलावादी लेखक आपल्या नाजूक शिरांची काळजी न करतां तावातावानें म्हणतात—कथनकला ही वसंतसेनेसारखी आहे. विशिष्ट हेतु म्हणजे शुद्ध शकार ! या हेतूनें कलेचा कितीहि पाठपुरावा केला म्हणून ती त्याला वश होणार आहे का ? आनंदरूपी चारुदत्तालाच ती माळ घालणार. या चारुदत्ताची नीति म्हणून एखादी पत्नी असली तरी तिची कुणीच पर्वा करणार नाहीं.

## हेतुप्राधान्यावर भर देऊं नका

प्रत्येक कथेंत विशिष्ट उपदेशप्रधान हेतु असलाच पाहिजे, या कित्येकांच्या अट्टाहासामुळेंच कलावाद्यांना असा आक्षेप घ्यायला जागा

मिळते. प्रत्येक कथालेखकाला कांहींतरी विशेष सांगायचें असतें व तेवढ्यासाठीं तो लेखणी हातांत घेतो, असें अनेकांना वाटतें. जणुं कांहीं हरिभाऊंसारखे कथालेखक व गीतारहस्य लिहिणारे लोकमान्य यांची भूमिका एकच आहे! तसें पाहिलें तर तरुण कथालेखकापाशीं सांगण्यासारखी गोष्ट एकच असते. तो म्हणतो, 'मी लिहितों तें कृपा करून वाचा आणि मला बरें म्हणा.' झाडाला प्रथमतः पालवी येते, त्याप्रमाणें कथालेखकाची कृति पहिल्यांदा रंजक गुणांनींच फुलणें योग्य! तिला हेतूचें फळ येऊंच नये, असें मी म्हणणार नाहीं. किंबहुना योग्य वेळीं तें येतेंच. पण बिचाऱ्या तरुण लेखकांवर पदोपदीं समाजाला संदेश सांगण्याची सक्ति करणें गैर आहे. आकाश कोसळूं लागलें म्हणून फुलपांखरें कां तें सांवरणार आहेत? मनुष्य गायला शिकतो तो गोड गळा असतो व गाण्यापासून आनंद मिळतो म्हणून. गायला यायला लागल्यानंतर त्यानें भक्तिप्रधान भजनें म्हणावींत कीं प्रणयपूर्ण गजल गावेत (कीं दोन्हींचाही लाभ श्रोत्यांना द्यावा) हा प्रश्न पुढचा आहे. होतकरू कथालेखकांचेंही तेंच ध्येय असलें पाहिजे. कलापूर्ण रीतीनें लिहिण्याचा अभ्यास त्यानें प्रथम करणें आवश्यक आहे. सहृदयता, आयुष्यांतील विविध अनुभव, समाजशास्त्राचा अभ्यास इत्यादिकांमुळें प्रौढपणीं त्याला महत्त्वाच्या विषयावर कथालेखन करतां येईल. किंबहुना तसें केल्याशिवाय त्याला राहवणारच नाहीं. पण आरंभीं आरंभीं तरी कथेला विषय घेतांना त्यानें हत्तीचा आकार निश्चित करायला गेलेल्या आंधळ्यांची गोष्ट विसरूं नये. बिकट सामाजिक प्रश्न म्हणजे चक्रव्यूह. त्यांत मतमतांचा गलबला नेहमीं चाललेला! प्रौढ कुमारिकांना पाहून कुणी निःश्वास सोडील तर कुणी नाक मुरडील. तरुणतरुणींतील प्रणयावर एक मोहकपणाचा मुलामा चढवितो, तर दुसरा त्याला काळा रंग फासून त्याचें विडंबन करतो. असल्या वादग्रस्त सामाजिक प्रश्नांची अननुभवी तरुणांनीं केलेली उथळ चर्चा सहसा हेतुपोषक अगर विचारप्रवर्तक होत नाहीं. वरेरकरांसारख्या अनुभवी लेखकांनासुद्धां या बाबतींत तोल संभाळण्याची कला साध्य झालेली दिसत नाहीं. 'स्वैरसंचार' या त्यांच्या कथासंग्रहांतील 'कलिकेचे अश्रू' अथवा 'माडाचें पोर' या गोष्टी हेतुयुक्त नाहींत असें नाहीं. पण दुधांत मिसळून

जाऊन त्याची गोडी वाढविणाऱ्या साखरेप्रमाणें या गोष्टींतील हेतूंनीं त्यांची रंजकता द्विगुणित केली आहे. उलट 'आमचे मालक' 'अबला' ' चिडलेली गाय ' ' स्वदेशी विमल ' इत्यादि त्यांच्या लघुकथांत हेतूंचे खडक व त्यांच्या बाजूनें तुरळक दिसणारी कलेची हिरवळ असें ओबडधोबड दृश्य दिसतें. मानवी जीवनाशीं अगर मनोवृत्तीशीं ज्याचा निकट संबंध आहे असा हेतु शोधून काढणें व सोन्याच्या अंगठींत हिऱ्याचा चिमुकला खडा बसवावा त्याप्रमाणें त्याची कलेशीं सांगड घालणें याला कल्पकता, सहृदयता, मार्मिकता, अभ्यासुवृत्ति इत्यादि गुणांची आवश्यकता आहे.

### एक हास्यास्पद मासला

हेतु–प्राधान्यामुळें रुक्ष व ओबडधोबड दिसणाऱ्या कलाकृति पाहिल्या कीं, कलावादी लेखकांना साहजिकच मूठभर मांस येतें. विभावरीबाईंनीं ' निःश्वास ' सोडल्यापासून अनेकांना निरनिराळ्या प्रकारचे श्वास लागूं लागले आहेत, असें दिसतें. कित्येकांना तर प्राणायामही करण्याची बुद्धि झाली असावी ! या बहुविध श्वासोच्छ्वासांपैकीं परवांच प्रसिद्ध झालेला 'माझे उच्छ्वास' हा कथासंग्रह पाहावा. तिच्यांतील 'नियमन' गोष्टीचा हेतु संततिनियमनाचें तत्त्व प्रतिपादन करण्याचा आहे. त्याकरितां लेखकांनीं स्वीकारलेला मार्ग मोठा मजेदार आहे यांत शंका नाहीं. एका तरुण शेतकऱ्याच्या कलिंगडाच्या वेलाला वीसवीस फळें लागतात. त्याचा अनुभविक बाप त्याला विचारतो, ' धर्मा, तुला कलिंगडांना भाव यायला पाहिजे कीं भाजीला घट्टे काढून विकायचीं आहेत तीं ? ' ' भाव तिथें देव ' ही म्हण सुप्रसिद्धच आहे ! अर्थात बाप मुलाला उपदेश करतो. ' प्रत्येक ताण्यावर आठ आठ फळें ठेव. बाकीचीं खुडून टाक. ' हा अनुभव पटतांच तो तरुण शेतकरी एका पदवीधराला म्हणतो, ' पण दादा, माणसांच्या बाबतींत नाहीं का असा कांहीं उपाय ? दादा, दर वर्षाला एक बाळ घरांत नांदत आहे. शेतकीला सध्यां बरकत नाहीं. आतां नको तीं मुलें असें म्हणायची वेळ आली आहे !'

' एष धर्मः सनातनः ' असा संततिनियमनाचा एखाद्या स्मृतींत उल्लेख नाहीं, म्हणून त्याचा चालू पिढीनें विचार करूं नये, असें म्हण-

णारांपैकीं मी नाहीं. कथालेखकांनीं आजारी माणसांप्रमाणें विशिष्ट विषयांचें पथ्य पाळलें पाहिजे, असेंही मला वाटत नाहीं. चातुर्मासांत सोंवळ्या माणसांना जसे कांदे वर्ज्य, त्याप्रमाणें प्रेमविवाह, घटस्फोट वगैरे विषयांवर कित्येकांचा बहिष्कार असतो; तर देवळावरून जातां जातां सुद्धां हात वर उचलून नमस्कार करावयाचा नाहीं अशा बाण्याच्या कट्टर नास्तिकाप्रमाणें कित्येक साध्या कौटुंबिक प्रेमळ गोष्टीकडे पाहत असतात. कथालेखकाची दृष्टि अशी संकुचित असणें इष्ट नाहीं. न्यायाधिशाप्रमाणें त्यानें कुठल्याही प्रश्नाच्या सर्व बाजू पाहिल्या पाहिजेत. निकाल देतांना त्याची वैयक्तिक सहानुभूति दिसली म्हणून हरकत नाहीं. उत्कट भावना व व्यापक सहानुभूति हे कोणत्याही कलापूर्ण कथेचे महत्त्वाचे घटक असतात, असें म्हटलें तरी चालेल.

## मांडणी कलासुंदर असली पाहिजे

या तत्त्वाप्रमाणें कथेला कोणताही विषय चालतो हें उघड आहे. तो विषय कलासुंदरपद्धतीनें मांडला मात्र पाहिजे. ‘कलिंगडाचा वेल व संततिनियमन’ ही गोष्ट त्या दृष्टीनें हास्यास्पद वाटत नाहीं का? आयुष्यांतले प्रसंग कितीही लहान व सामान्य असेनात. कलावंत कथालेखकाच्या दृष्टीनें त्यांतील हृदयस्पर्शित्व अचूक शोधून काढलें पाहिजे. गृहीत विषयांतील आकर्षकता जाणणें व ती सुंदर रीतीनें व्यक्त करणें हें कथालेखकाचें मुख्य कार्य आहे. कलाहीन लेखकानें लिहिलेल्या महायुद्धावरल्या कादंबरीपेक्षां कलावंत लेखकानें लिहिलेल्या लहान मुलांच्या भांडणावरील लघुकथाच वाङ्मयांत अमर होईल. फडके अगर अत्रे यांच्यासारखे लेखक कलाकृतीचें कार्य उपदेश नाहीं असें म्हणतात. याचा अर्थ तिच्यांत गर्भित असलेल्या तत्त्वांचा मोहक विकास करण्याची शक्ति लेखकांच्या अंगीं असली पाहिजे, एवढाच घ्यायचा! अत्र्यांनीं लिहिलेल्या बालकथांत कांहींच शिकवण नाहीं असें कोण म्हणेल? प्रो. फडक्यांच्या कथासंग्रहांत ‘इंदुताईच्या चातुर्मासापासून’ ‘जगांतील पहिलें पाऊल’ या गोष्टीपर्यंत अनेक हेतुप्रधान कथा आढळतील. मात्र या उल्लेखिलेल्या दोन गोष्टींतच तुलना करावयाची असेल, तर भावना व सूचकता या कलागुणामुळें दुसरी

पहिलीपेक्षां सरस वाटते. सूक्ष्म भावनांचा आविष्कार, विविध सौंदर्याचें दर्शन, परहृदयप्रवेशाचा आनंद इत्यादि कलागुणांना शोभणारी तत्त्वाची पार्श्वभूमि असली, तर अशा कथाचित्राला कोण नाक मुरडील ? पण मागें महालाचा देखावा व पुढें लक्तरें नेसलेल्या भिकाऱ्यांचा संसार असलें विसंगत दृश्य पहायला नाटकगृहांत फुकटे प्रेक्षकसुद्धां जाणार नाहींत.

## तिरंगी सामना

कथावाङ्मय, प्रणय व नीति या तिरंगी सामन्याचाही इथेंच विचार केलेला बरा. प्रचलित कथावाङ्मयावर स्वैर प्रणयाच्या पुरस्काराचा व पर्यायानें नीतीच्या खुनाचा नुसता आरोपच आला आहे, असें नाहीं. हा खटला सेशनकमिट झाला आहे, अशी कित्येकांची समजूत आहे. कित्येक प्रणयाला फांशीची शिक्षा होणार या आनंदांत गर्क आहेत. एखाद्या दारूबाजानें आईबापापासून बायकापोरांपर्यंत सर्वांना बडवून घरांतून घालवून द्यावें, त्याप्रमाणें शृंगारानें वीररसापासून वत्सलरसापर्यंत इतर सर्व रसांची गळेचेपी करून त्यांची कथामंदिराबाहेर हकालपट्टी केली आहे, अशीच या प्रणयविरोधी आक्षेपकांची समजूत झालेली दिसते. पण मला वाटतें, ही समजूत नाहीं; हा समजुतीचा घोंटाळा आहे.

कथावाङ्मय म्हणजे कांहीं कार्तिकेयाचें देवालय नाहीं कीं तिथें स्त्रीला मज्जाव असावा ! मानवी जीवनांत जें जें रम्य, मधुर, सुंदर व हृदयंगम असेल, त्यांचें कलापूर्ण चित्रण कथालेखकानें करायचें नाहीं तर तो हातांत लेखणी घेईल तरी कशाला ? कालिदास, शूद्रक, बाण यांचें मोठेपण सध्यांच्या प्रणयप्राचुर्याचे आक्षेपक सुद्धां मान्य करतील. पण शाकुंतल, मृच्छकटिक अगर कादंबरी ह्या सुंदर रेशमी वस्त्रांचा प्रणयाचा रंग वैराग्याच्या रिठ्यांनीं धुवून काढावयाचा म्हटलें, तर तें शक्य आहे का ? या रंगाच्या मोहकपणामुळेंच त्या वस्त्रांचें मूल्य किती तरी पटीनें वाढलें आहे, असें म्हटलें तर मुळींच चूक होणार नाहीं. शिवाय रवींद्रांनीं शाकुंतलांतून जेवढा उदात्त अर्थ काढला आहे, तेवढा सध्यांच्या प्रणयरम्य कथांतूनही निघूं शकेल ! पण सद्यःकालीन कालिदासाच्या वांट्याला तें भाग्य यायला दहावीस शतकें तरी जावीं लागतील.

हीं गाणीं ऐकून बोंडूचा तांबडा रंग रागानें अधिकच तांबडा होई!

पायरीवरच्या अंबुताईच्या नाकाला आणखी थोडी मुरड पडे.

दोघांनाही फणसाप्रमाणें काव्य करतां येत होतें! पण फणसाची निंदा करायची तरी कशी? सुंदर हिरवा रंग, मऊ मऊ अंग, पिकतांना हिरवा चांफा फुलल्यासारखा वास–बोंडू आणि आंबे यांची चडफड मनांतल्या मनांतच राहिली. येऊन जाऊन एक काय तें व्यंग होतें. फणसांना झाडावर लगायला चांगली जागा मात्र नव्हती. आणि कुठें असली तरी त्यांच्या अंगाला ती पुरी थोडीच होणार होती!

* * *

काळाकुट्ट काळोख! त्यांत वळवाच्या पावसाची भर!

एका फणसानें विचारलें, 'काय वाजतंय हें?'

आंब्यानें उत्तर दिलें. 'भुतांचीं पावलं.'

लगेच गडगडाट आणि कडकडाट!

फणसानें कांपऱ्या स्वरानें प्रश्न केला 'काय आहे हें?'

बोंडूनें उत्तर दिलें 'भुतांच्या नौबती नि मशाली!'

फणस घाबरून गेला. लपून बसायलाहि जागा दिसेना त्याला. मनाला धीर यावा म्हणून त्यानें हांक मारली–

'काजूकाका–'

'ओ' नाहीं. भुतांचीं पावलें मात्र अधिक जोरानें वाजत होतीं.

फणसानें केंविलवाण्या स्वरानें हांक मारली 'अंबुताई–'

'ओ' नाहीं.

भुतांच्या नौबती मोठमोठ्यानें वाजूं लागल्या. त्यांनीं मशाली पाजळल्या. आतां–

फणसाच्या सर्व अंगावर भीतीनें कांटा उभा राहिला. भुतें गेलीं; पण तो कांटा कायमच राहिला.

दुसरे दिवसापासून फणसानें बोंडूंना व आंब्यांना हंसायचें सोडून दिलें. तो हंसतोय् असें वाटलें कीं ते मोठमोठ्यानें गाऊं लागतात–

‘ भुतावळ दाटे
लपुं तरी कुठें ?
पळुं कुण्या वाटे ?
आले अंगीं कांटे ! ’

## लोकशिक्षणात्मक साहित्य

शिक्षणप्रसार हा साहित्यमंदिराचा पाया झाला. त्याच्यावरील पहिला मजला म्हणजे मतप्रचारात्मक वाङ्मय. या वाङ्मयांत काव्य–शास्त्र–विनोदाला वाव नाहीं असें नाहीं. पण तरवारीच्या मुठीवर कितीही सुंदर नक्षी काढली तरी तिची योग्यता शेवटीं तिच्या धारेवरच ठरायची ! वर्तमानपत्रें व कांहीं अंशीं मासिकें यांचें स्वरूप असेंच असतें. लोकशिक्षण हें त्यांचें मुख्य ध्येय. लोकमताला वळण लावणें हें त्यांचें मुख्य कार्य. कलेपेक्षां विचाराला आणि वाङ्मयविलासापेक्षां वर्तमान घडामोडींना त्यांना महत्त्व द्यावें लागतें. ‘हिंदु’-सारखें सामर्थ्यवान् पत्र गोमन्तकांत नुक्तेंच होऊन गेलें ‘ भारता’ सारखीं पत्रें आपलें कार्य जोमानें करीतच आहेत. पण वृत्तपत्रांची कुचंबणा व्हावी अशीच दुर्दैवानें गोमन्तकाची परिस्थिति आहे. येथील वृत्तपत्राचा संपादक विद्वान्, चतुर, रसिक आणि निर्भीड असला तरी गोमन्तकाबाहेर त्याच्या या गुणांचा काय उपयोग ? येथील स्थानिक, राजकीय व सामाजिक प्रश्न महाराष्ट्राला कळणेंच कठिण ! मग त्याच्याविषयीं जिव्हाळा तरी कसा उत्पन्न व्हावा ? जिच्यांतून आवाज बाहेर जाऊं शकत नाहीं अशा खोलींत कितीही गोड गळ्याच्या गवयानें आपला घसा कोरडा केला म्हणून त्या इमारतीबाहेर लोकांची दाटी झालेली दिसेल का ? सर्व गोमन्तकाचें एकच मराठी मुखपत्र होऊन त्याच्यांत वाङ्मयात्मक व सामाजिक प्रश्नांना प्राधान्य मिळेल तर त्याचें आकर्षण महाराष्ट्रीयांना वाटण्याचा संभव आहे. पण ही गोष्ट आकाशपुष्पांच्या भयंकर वृष्टीनें बेशुद्ध पडलेल्या वन्ध्यापुत्राला सावध करण्याकरितां त्याच्या डोळ्यांत शशशृंगाचें अंजन घालण्यासारखीच अनेकांना वाटायची. प्रमुख महाराष्ट्रीय वृत्तपत्रांनीं गोमन्तकांत निघणाऱ्या वृत्तपत्रांतील महत्त्वाचे उतारे व गोमन्तकवार्ता नियमितपणें दिल्यास सद्यःस्थिति सुधारेल. पण ही सुधारणा म्हणजे शक्तिवर्धक औषध ! विकृति पूर्णपणें नाहींशी करण्याचा कांहीं तो उपाय नव्हे.

मासिकांचें क्षेत्र स्वभावतः वर्तमानपत्रांइतकें संकुचित असत नाहीं. नागपूरच्या 'महाराष्ट्रां'तील भ्रमराचा गुंजारव गोमन्तकांतील वाचकांना गूढगुंजनाइतकाच गम्य वाटेल; पण नागपूरच्या मासिकांतील कथा व लेख वाचतांना कांहीं त्यांना तसा भास होणार नाहीं. त्यामुळें या क्षेत्रांत गोमन्त-काला अधिक यश येण्याचा संभव आहे. अलीकडच्याच गोष्टी पाहिल्या तर मध्यंतरीं निघालेलें 'सुबोध' किंवा यंदाच जन्माला आलेलीं ' युगांतर ' व ' कला ' या दृष्टीनें स्वागतार्ह वाटतात. पण आश्रयाच्या अभावाचा बागुलबोवा येथील मासिकांनाही भेवडावल्यावांचून राहत नसेल ! खुद्द महाराष्ट्रांत नित्य नवीं मासिकें जन्माला येत आहेत. मध्य-वर्ती प्रकाशनस्थळ, लेखकवर्गाशीं परिचय, महाराष्ट्राच्या आवडी-निवडीची कल्पना इत्यादिकांचा त्यांना स्वाभाविकपणें फायदा मिळत असूनही त्यांत बालमृत्यूच फार होतात. अशा स्थितींत गोमंतकांतील मासिकांनीं यशस्वी होणें म्हणजे डोंगरपठारावर पाणी चढविण्यासारखेंच आहे, असें कुणाला वाटलें तर त्यांत काय चूक आहे ? दिवसेंदिवस गोमंतकीय लेखकांविषयींचें महाराष्ट्रीय वाचकांच्या मनांतलें प्रेम वाढत आहे. अशा वेळीं सर्व गुणी गोमंतकीय लेखकांना एकत्रित करणाऱ्या मासिकाला यशाची आशा बाळगणें शक्य आहे हें मात्र खरें !

## दुसरा मजला–शास्त्रीय वाङ्मय

साहित्यमंदिरांतील दुसरा मजला शास्त्रीय वाङ्मयाचा. हा मजला मराठी वाङ्मयांत जवळजवळ रिकामाच आहे. आम्हांला शास्त्र म्हणजे भुताटकीच वाटते कीं काय कुणाला ठाऊक ! कॉलेजांत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्याला रेडियोंत अमुक गायिकेचें गाणें कधीं आहे हें विचारा. तो क्षणाचाही विचार न करतां बरोबर उत्तर देईल. पण रेडियोच्या रचनेचा अगर त्याच्या मुळाशीं असलेल्या शास्त्रीय तत्त्वांचा प्रश्न निघूं दे. तो नुसता आश्चर्यवत् पाहूं लागेल. आकाशांतले गुरु, शुक्र, मंगळ ज्यांना ओळ-खतां येत नाहींत त्यांना सहज हात दाखवावा ! लगेच शुक्राच्य उंचवट्यावर काय काय पिकतें व गुरूच्या समुद्राकडे जाणारी नदी मधेंच वाळवंटांत गुप्त झाल्यामुळें पुढील भाग कसा ओसाड होतो

याचीं सविस्तर वर्णनें ऐकायला मिळतील. सहवासोत्तर विवाह अगर विवाहोत्तर सहवास यांसारख्या विषयांवर वादविवाद करण्याची हौस असलेल्यांपैकीं एखाद्यानें तरी विवाहसंस्थेचा शास्त्रीय दृष्टीनें अभ्यास करण्याचा प्रयत्न केलेला असतो का? उलट लग्न होण्यापूर्वीच यांच्यापैकीं अनेक संततिनियमनावरलीं पुस्तकें वाचून मोकळे झालेले असतात! गणित-शास्त्र शिकण्याच्या तीव्र इच्छेमुळेंच लहानपणीं आपल्या मनांतली आत्म-हत्येची लहर नाहींशी झाली असें रसेलनें म्हटलें आहे. पण आमच्याकडे तें शिकावें लागतें म्हणूनच आत्महत्या करायला निघालेले लोक अधिक आढळायचे!

## आन्धळ्याच्या हातांत दिवा

पाश्चात्य देशांत प्रत्यहीं नवे शोध लागत आहेत. कुणाची इच्छा असो वा नसो, यंत्रें मनुष्यजातीच्या देव्हाऱ्यांत जाऊन बसलीं आहेत हें नाका-रण्यांत अर्थ नाहीं. या नव्या देवांचें स्वरूप जाणण्याची आम्हांला मुळींच इच्छा नाहीं. देवाला नवस केला अगर त्याच्यापुढें नाक घासलें म्हणजे झालें हीच जिथें मूळची समजूत तिथें यंत्र–देवाशीं तरी निराळें वर्तन कोण करणार? आळशावर गंगा आली तरी आपलें अंथरूण भिजूं नये म्हणून तो जसा बाजूला होईल तशांतली आमची सध्यांची धडपड वाटते. यापुढें जगांत ज्या समाजाला गुलाम म्हणून जगायचें नसेल त्यानें भौतिक शास्त्रांना आपले गुलाम बनविलें पाहिजे, ही गोष्टच अजून आमच्या गांवीं नाहीं. पदार्थविज्ञान, रसायन, वैद्यक, विद्युत्, यंत्रज्ञान यांच्यावर अजून सुंदर बालोपयोगी पुस्तकेंसुद्धां मराठींत होऊं नयेत ही केवढी दुर्दैवाची गोष्ट आहे!

भौतिक शास्त्रांच्याप्रमाणें सामाजिक शास्त्रांचाही व्यासंग आपल्यांत नाहींच म्हटलें तरी चालेल. मार्क्सचा समाजवाद अगर फ्रॉइडचें मनोविश्लेषणशास्त्र यांच्याविषयीं सामान्य मराठी वाचकानें कुठून माहिती मिळवायची? इंग्रजींतून अशा प्रकारची तुटपुंजी माहिती घेऊन कांहीं लेखक तिचें मराठी शुद्धीकरण मधूनमधून करीत असतात; पण कुठले तरी चार उतारे वाचून एखाद्या ग्रंथाचें रहस्य कुणाला तरी कळणें शक्य आहे

काय ? पुष्कळदां असे लेखक आंधळे असतात. अज्ञान, अनिष्ट वकिली अगर अशाच प्रकारच्या अन्य कारणानें अंध झालेल्या या लेखकांच्या हातांतील ज्ञानदीपानें मार्गावर प्रकाश पाडण्याऐवजीं आगी लागण्याचाच संभव अधिक असतो. मराठी वाङ्मयांतील अशा प्रकारच्या नव्या आगी व त्या विझविण्याकरितां धांवत आलेले जुने बंब यांची माहिती अगदीं ताजी असल्यामुळें तिची पुनरुक्ति मी येथें करीत नाहीं.

## गोमंतकाचा स्वतंत्र मार्ग

भाषाशास्त्र, इतिहास, समाजशास्त्र, अर्थशास्त्र, वैद्यक इत्यादि अनेक शास्त्रीय साहित्यशाखांत गोमंतकाला स्वतंत्र कर्तृत्वाला वाव आहे. कोंकणी बोलीचा भाषाशास्त्रदृष्ट्या अभ्यास झाला तर तो जुन्या मराठीवर देखील प्रकाश पाडूं शकेल. गोमंतकाचा इतिहास तर महाराष्ट्राला अजून अज्ञातच आहे म्हटलें तरी चालेल. समाजशास्त्राच्या व्यवस्थित अभ्यासाला गोमन्तकासारखें मर्यादित क्षेत्र फार उपयोगी पडतें. या शास्त्रांतले गप्पांचे दिवस निघून गेले आहेत. आतां गणिताचे दिवस आले आहेत. आजच्या समाजाचें भवितव्य स्मृतींतल्या शब्दांपेक्षां अनुभवाच्या आंकड्यांवर अवलंबून ठेवणेंच अधिक योग्य नाहीं का ? जातिभेद व अस्पृश्यता असल्या हानिकारक रूढींचें मंडन मोठमोठ्या तत्त्वांच्या नांवाखालीं करण्याचा मोह अजून आमच्या पंडितांना आवरत नाहीं. अनिष्ट रूढींशीं लढण्याच्या वेळीं हातपाय गाळणाऱ्या या अर्जुनांना युद्धप्रवृत्त करणारी भगवद्गीता म्हणजे समाजशास्त्रच होय. गोमन्तकांतील बुद्धिवान् तरुणांनीं व्यासंगपूर्वक या शास्त्राचा अभ्यास केल्यास केवळ गोमन्तकीयच नव्हे तर महाराष्ट्रीय समाजालाही तो मार्गदर्शक होईल. वैद्यकासारख्या शास्त्रांतही फ्रेंच भाषेच्या ज्ञानामुळें गोमन्तकाला बरेंच कार्य करतां येण्याजोगें आहे. महाराष्ट्रांत फ्रेंच शिकणाऱ्यांपैकीं बहुतेक लोक संस्कृतच्या रणांगणांतून पळून आलेले असतात. ‘ शक्ल् पच् मुचि ’च्या भुतावळीला भ्यालेले हे लोक परीक्षा पास झाल्यावर पुढें फ्रेंचचा व्यासंग कशाला चालू ठेवतील ? शास्त्रीय वाङ्मयाच्या अभ्यासकाला कीर्ति कधींहि लवकर माळ घालीत नाहीं हें खरें. सध्यांची सामाजिक व आर्थिक परिस्थितीहि अशा

व्यासंगाला फारशी उपकारक नाहीं. पण मार्गांत पर्वत उभे राहिले तरी बोगदे खोदून आपण त्यांच्यापलीकडे जातोंच कीं नाहीं ?

## ललित-वाङ्मय

ललित-वाङ्मय हा साहित्य-मंदिराचा सर्वांत वरचा मजला. ललित वाङ्मयाला अशा रीतीनें शिक्षण, वृत्तपत्रें व शास्त्रीय वाङ्मय यांच्या डोक्यावर मीं बसविलेलें पाहून अनेकांना राग येईल. कित्येकांना हा 'अहो रूपम्'चा एक प्रकारहि वाटेल. हे सर्व विरोधक विचारतील, 'ज्ञानकोशापेक्षां हरिभाऊंच्या कादंबऱ्यांची किंमत तुम्ही जास्त मानतां कीं काय ? कुठें ज्ञानप्रकाश–केसरीचें कार्य आणि कुठें करमणुकीकरितां जन्माला आलेलीं एकच प्याल्यासारखीं नाटकें ? शामभटानें आपली तट्टाणी श्यामकर्ण आहे म्हणून सांगितलें तर तें एक वेळ चालेल. पण ती इंद्राच्या ऐरावताहूनहि सुंदर आहे म्हणून तो सांगूं लागला तर तें कोण ऐकून घेईल ? फुरसदीचा वेळ मजेनें घालवायला तुमचें ललितवाङ्मय छान असतें. पण उद्यां अलगुजें बंदुकांपेक्षां लढायला अधिक उपयुक्त असतात असें म्हणूं लागाल तुम्ही ! '

समाजाच्या प्रगतीच्या दृष्टीनें मतप्रचारक वाङ्मय अगर शास्त्रीय वाङ्मय यांना मी कोणत्याही प्रकारें ललितवाङ्मयापेक्षां कमी लेखीत नाहीं. पण ललितवाङ्मयाला नुसतें मधुर सरबत मानणाऱ्यांना मी एवढेंच विचारीन, 'पंडितमहाराज, प्रभु रामचंद्राचें एवढें मोठें रामराज्य होऊन गेलें. त्या राज्याच्या कारभाराचे वार्षिक अहवाल कुणाला आतांपर्यंत सांपडले आहेत काय ? आणि सांपडले तरी कितीसे लोक ते वाचतील ? पण वाल्मीकीचें रामायण मात्र आपण अजूनहि गोडीनें वाचीत आहों. भगवान् कृष्णांनीं रुक्मिणीहरण केलें त्या वेळीं कुंडिनपुरांतील वृत्तपत्रानें (अर्थात् तें असल्यास) ती बातमी तिखटमीठ लावून लिहिली असेल; एवढेंच नव्हे तर संस्कृतिनाश करणाऱ्या या विवाहाचा त्यानें जोरदार व जळजळीत निषेध केला असेल. पण आज त्या निषेधाचें नाममात्र तरी अस्तित्व आहे का ? उलट रुक्मिणीस्वयंवराची मधुर कथा मात्र अजूनहि आपलें मन रंजवीत आहे. राजकवि कालिदासाचा स्वामी विक्रमादित्य

काय कमी पराक्रमी होता! कालिदासाच्या लेखणीपेक्षां त्य
त्या वेळच्या लोकांचे डोळे अधिक दिपले असतील.
त्याच्या पराक्रमाचा इतिहास न लिहितां शकुंतलेच्या प्रे
रचल्यामुळें विक्रमाविषयींचें आपलें ज्ञान कितीतरी अपुरें

हीं प्रश्नोत्तरें वकिली पद्धतीचीं झालीं. न्यायाधीशाच्या
झालें तर वाङ्मयाच्या या विविध प्रकारांची एकमेकांशीं तु
नाहीं असें म्हणणें योग्य होईल. आंब्याच्या झाडाचीं प
श्रेष्ठ? मुळें श्रेष्ठ मानलीं म्हणून तीं कुणी चाखून पाहणार
श्रेष्ठ मानलीं म्हणून मुळें खणून काढणें कांहीं शहाणपणा
ललितवाङ्मय प्रचारकी वाङ्मयाप्रमाणें क्षोभजनक नसतें
वाङ्मयाप्रमाणें ज्ञानवर्धकहि नसतें. पण क्षोभ व ज्ञान
असणारा जो आनंद आहे त्याचीच बहुजनसमाजाला अ
वादविवाद आणि व्याख्यानें हीं निरुपयोगी आहेत असें
नाहीं. पण गोड गाण्याइतकी त्यांना गर्दी कशी होणार?

## ईव्हचा पुतळा व ममी

बडोदें येथील सुंदर चित्रमंदिरांत अनेक प्रेक्षणीय व
आंतल्या भागांत हजारों वर्षांपूर्वीची इजिप्तमधील ममी
द्वारापाशींच ईव्हचा सुंदर पुतळा आहे. त्या निष्प्राण
कीं मनांत हजारों तऱ्हेचे विचार येतात. निर्जीव देहा
विश्रेपासून मृत्यूनंतर मानवी जीवाच्या होणाऱ्या स्थितीप
त्या ममीकडे पाहतां पाहतां मनाला चाटून जातात; पण
लाहि प्रेक्षक त्या ममीपाशीं फार वेळ उभा रहायल
नाहीं; पण तोच प्रेक्षक बाहेर आला कीं, ईव्हच्या
व मनोहर पुतळ्याजवळून त्याला हलवतच नाहीं. ईव्हशीं
णाऱ्या सर्पाच्या अंगावरून त्याला हात फिरवावासा
तसें पाहिलें तर तो पुतळा जन्मापासून निर्जीव! ती मम
चालती बोलती असेल. पण तिच्या एके काळच्या सजीवप
काय किंमत? सामान्य वाचकाला ललितवाङ्मय ईव्हच्

प्रमाणेंच आकर्षक वाटतें; आणि ललितवाङ्मयाचा हा पुतळा कांहीं निर्जीव नसतो. उलट वाचकाच्या भोंवतालीं रसरसणाऱ्या जीवनानें तो एकसारखा हालचाल करीत असतो.

साहित्याचें मोहिनीरूप ललितवाङ्मयांतच दिसत असल्यामुळें या वाङ्मयाच्या भजनीं अधिक लोक लागतात हें स्वाभाविकच आहे. मराठी वाङ्मयाच्या या शाखेवर गोमंतकांत लागलेलीं फळेंहि मधुर आहेत. रंगभूमीच्या विलासापासून दूर पडल्यामुळेंच कीं काय महाराष्ट्राला आकर्षून घेणारी नाट्यरचना गोमंतकांत झालेली दिसत नाहीं. कथा व काव्य या दोन्ही विभागांत मात्र गोमन्तकीय लेखक दिवसेंदिवस प्रगति करीत आहेत ही आनंदाची गोष्ट आहे. मडगांवच्या साहित्य संमेलनापासून गेल्या पांच वर्षांचा इतिहास पाहिला तरी वि. स. सुखठणकर, प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई यांनीं कथालेखक म्हणून आणि कारे, बोरकर यांनीं कवि म्हणून महाराष्ट्रीय कीर्ति मिळविली. यांच्याइतकें नसलें तरी थोडेंफार स्पृहणीय यश ज्यांच्या पदरांत पडलें आहे असे लेखकहि कांहीं संख्येनें थोडेथोडके नाहींत. पोर्तुगीज भाषेचा परिचय, निसर्गसुंदर जन्मभूमि, कलापूर्ण वातावरण, दोन भिन्नधर्मीय समाजांचें संघटन इत्यादि विविध साधनें येथील ललित लेखकांना लाभण्यासारखीं असल्यामुळें त्यांच्याकडून महाराष्ट्रशारदेच्या अंगावर चढणारे अलंकार मोलाचे असावेत अशी अपेक्षा केली तर तिच्यांत अस्वाभाविक असें काय आहे ?

## ललित–वाङ्मयाचे पंचप्राण

सौंदर्यदृष्टि, सहृदयता, वैयक्तिक तत्त्वज्ञान, सूक्ष्म निरीक्षण व कलाचातुरी हे ललित लेखनाचे पंचप्राण होत. लेखकानें त्यांच्यापैकीं एकादोहोंची उपेक्षा केली तरी त्याची मानससृष्टि उजाड झाल्याशिवाय राहत नाहीं.

## सौंदर्यमीमांसा

ललित लेखकानें सौंदर्यलालसा बाळगावी याचा अर्थ रस्त्यानें जाणाऱ्या येणाऱ्या प्रत्येक तरुणीकडे टक लावून पाहत बसण्याचा राजरोस परवाना सरस्वतीदेवी त्याला देत असते असा मात्र नाहीं. निसर्ग व मनुष्य यांच्यां-

तलें सौंदर्य काव्यदृष्टीनें ओळखण्याची कला त्याच्या अंगीं हवी एवढाच या म्हणण्याचा हेतु. श्री. कारे यांच्या काव्यसंग्रहाच्या प्रस्तावनेंत प्रो. वा. म. जोशी यांनीं उपस्थित केलेला एक मुद्दा या ठिकाणीं पुष्कळांना आठवेल. श्री. वामनरावजींचे वकिली प्रश्न असे आहेत, 'सृष्टि ही सुंदर आहे, पावन आहे, आनंदमय आहे अशा प्रकारची भावना आपणांमध्यें जी कित्येक वेळां दिसून येते ती खरोखरच साधार आहे कीं काय? सृष्टीमध्यें साप, फुरशीं, वाघ, सिंह, कांटे, पातेरा, चिखल, डबकीं वगैरे ज्या गोष्टी आहेत, त्यांकडे आपण दुर्लक्ष करितां, का त्यादेखील तुम्हांला एखाद्या 'दिव्य' व 'अनिर्वचनीय' अर्थानें सुंदर, पावन व आनंदमय वाटतात? आणि एखादे वेळेस तसें वाटत असलें तर अशा अनाधार भावनेचें मूल्य काय? तिचें स्तोम माजविणें इष्ट आहे काय? सृष्टिपूजक कवींचा आधुनिक कालांतला आदिगुरु ,जो वर्ड्स्वर्थ त्याला देखील अखेरीअखेरीला आपल्या सृष्टिविषयक कल्पनांबद्दल व भावनांबद्दल संशय वाटूं लागला होता हें या कवींनीं ध्यानांत धरावें.' सृष्टीमध्यें वरील सर्पकारिकेंतील सर्व गोष्टी आणि त्याहूनहि भयंकर असलेल्या आणखी कितीतरी इतर गोष्टी आहेत. आंबोलीच्या आसपासच्या जंगलांत फिरतांना वाघाची डरकाळी ऐकल्यावर वनश्री पाहण्याकडे कुणाचें लक्ष लागणार नाहीं हेंहि कांहीं खोटें नाहीं. तळ्यांतल्या चिखलांत रुतलेला मनुष्य त्याच्यांत सुंदर कमळें उगवतात असा विचार करून स्वस्थ बसेल काय? गुलाबाचे कांटे झाले तरी ते हातांतून रक्त काढतातच! पण हें सर्व खरें असूनहि सृष्टि सुंदर नाहीं असें कोण म्हणेल? ढेंकणांनीं झोंपमोड होऊन पिसाळल्यामुळें अंगणांत यावें तों जिकडेतिकडे चांदणें गात नाचत असलेलें दिसावें! अशा वेळीं डोळे मिटून त्या ढेंकणांवर सूड घेण्याचा विचार करीत कुणी बसेल काय? शिकारी चित्रकार असला तरी माळ्यावर वाघ उडी मारण्याचा प्रयत्न करीत असतांना तो त्याच्या हालचालींकडे कांहीं पाहत बसणार नाहीं. बंदुकीचें काम आधीं, कुंचल्याचें नंतर, हें काय त्याला कुणी शिकवायला हवें? पण घरीं आल्यावर त्याची कलादृष्टि जागृत

होऊन तो त्या वाघाचें चित्र काढील आणि तें सुंदरही वठेल. ललित लेखक सृष्टीकडे पाहतात ते कलादृष्टीनें! जीवनाच्या दृष्टीनें सृष्टि सुंदर आहे व कुरूपही आहे. पण कला हें कांहीं जीवनाचें नुसतें प्रतिबिंब नाहीं; तें जीवनाचें चित्र आहे.

सृष्टीच्या आनंददायक सौंदर्याविषयीं हा विचार झाला. ती पावन आहे ही कल्पना तिच्या सौंदर्याइतकी कांहीं सामान्य मनुष्याला पटणारी नाहीं. पण भौगोलिक दृष्ट्या विशिष्ट प्रदेशांत राहणाऱ्या लोकांच्या राहणीवर व स्वभावावर जसा तेथील परिस्थितीचा परिणाम होतो त्याप्रमाणें निसर्गाचाही मनुष्याच्या कल्पनेवर होतो. जिथें औषधालासुद्धां झाड मिळायचें नाहीं, पाणी दिसायचें तें फक्त नळाच्या तोटींतून बाहेर पडतांना, मोटारींच्या शिंगांच्या आवाजापुढें पांखरांचा सूर कानीं पडतांनासुद्धां मारामार, तिथें निसर्ग निष्प्राण आहे आणि सृष्टीची सजीवता निव्वळ कविकल्पना आहे असें वाटणें स्वाभाविक आहे. पण गोमन्तकाच्या या निसर्गसुंदर भूमींत तरी ललित लेखकाला सृष्टीपासून दूर पळून जातां येणार नाहीं. त्याची कल्पना वर भरारी मारतांना माडपोफळीवर थोडा वेळ विसावेलच. त्याचें उचंबळून आलेलें हृदय जललहरींचें अनुकरण केल्याशिवाय कधींतरी राहील का? वर्ड्स्वर्थ सृष्टिपूजक होता याचा अर्थ घरावर पडणारें झाड तोडण्याला त्यानें परवानगी दिली नसती असा कांहीं होत नाहीं. जन्म आणि मृत्यु या दोन्ही गोष्टी नैसर्गिक आहेत म्हणून जन्माचें कौतुक करायचें कुणीं सोडून दिलें आहे का? सृष्टींतील सौंदर्य व उदात्तत्व हींहि अशींच आहेत.

मानवी सौंदर्याचें चित्रण करतांनाहि हीच शक्ति ललित लेखकानें संपादन केली पाहिजे. शरीराइतकींच मनें सुंदर असतात, आणि तरुणतरुणींच्या विभ्रमाप्रमाणेंच वृद्धांचें वैराग्यहि कलेचें नृत्यांगण होऊं शकतें, हें लक्षांत घेतलें म्हणजे कलावंत लेखकाच्या सौंदर्यचित्रणाचें क्षेत्र किती मोठें आहे हें कळून येईल.

## वाल्मिकी व मोपाँसा

सहृदयता हा ललित लेखकाचा दुसरा मोठा गुण; किंबहुना इतर गुणांमध्यें दोन ध्रुवांइतकें अंतर असलेले साहित्यिक या गुणांत अगदीं जवळजवळ

बसलेले आढळून येतील. प्राचीन आर्यावर्तांतील एकपत्नी रामचंद्राचें आणि पतिव्रता सीतेचें चित्र रेखाटणारा वाल्मिकी ऋषी कुठें आणि एकोणिसाव्या शतकांतील फ्रेंच समाजाचें व त्यांतील वाममार्गी कामुकांचें चित्रण करणारा मोपॉंसा कुठें? पण झाडावर सुखानें बसलेल्या क्रौंच पक्षाच्या जोडप्यांतील एकाला पारध्यानें बाण मारून खालीं पाडलेलें पाहतांच वाल्मिकीच्या तोंडांतून शापवाणी बाहेर पडली–

मा निषाद प्रतिष्ठां त्वं अगमः शाश्वतीः समाः ।
यत्क्रौंचमिथुनादेकमवधीः काममोहितम् ॥

पुढें रामानें केलेला सीतात्याग सुद्धां ज्यानें गंभीर वृत्तीनें पाहिला, त्या ऋषीच्या व्याकुळ हृदयाचे हे बोल त्याचें कविहृदय दर्शवीत नाहींत काय? मोपॉंसाच्या 'Love' या गोष्टींतहि असाच प्रसंग आहे. पांखरांची शिकार करायला दोघे मित्र गेले होते. तिथें—

"I fired and one of them fell almost at my feet. It was a teal, with a silver breast; and then, in the blue space above me, I heard the voice, the voice of a bird. It was a short, repeated, heart-rending lament; and the bird, the little animal that had been spared, began to turn round in the blue sky, over our heads, looking at its dead companion, which I was holding in my hand. He cried over our heads continually, and continued his cries. Never have any groans of suffering pained me so much as that desolate appeal, as that lamentable reproach of this poor bird, which was lost in space."

आर्यऋषीच्या शोकाचा झालेला श्लोक व फ्रेंच शिकाऱ्याच्या हृदयांतून उचंबळून आलेले हे उद्गार किती सारखे वाटतात! मोपांसाला संस्कृत येत नव्हतें म्हणून बरें! नाहीं तर एवढ्यावरून तो वाङ्मयांतला बाबू चप्पेवालासुद्धां ठरायचा!

### क्यूप्रिन व त्रिओ

ललित लेखकाला विशिष्ट दृष्टिकोन हवा म्हटलें कीं कित्येकांना काव्यांत भूमिति घुसडविल्यासारखी वाटते. पण कला सहेतुक असावी कीं असू

नये, अश्लीलता, नवनीति विरुद्ध पुराणनीति इत्यादि वादळी वाद या एकाच बिंदूभोंवतीं नाचत आहेत, असें म्हटलें तरी चालेल. कोंकणांत दोन रुपयांच्या चिंचेच्या झाडाचा मालकी हक्क ठरविण्याकरितां हायकोर्टा-पर्यंत जाणारे व आंबट तोंड करून परत येणारे वादीप्रतिवादी नाहींत का ? मराठी वाङ्मयांतील भांडणेंहि अशाच प्रकारचीं वाटतात. ठराविक पद्धतीच्या खंडनमंडनापेक्षां दोन उत्कृष्ट उदाहरणेंच या बाबतींत अधिक उपयुक्त होतील. प्रख्यात रशियन लेखक क्यूप्रिन याची वेश्याजीवना-वरील 'यामा' ही कादंबरी अगर सुप्रसिद्ध फ्रेंच नाटककार ब्रिओ याचें उपदंशासारख्या रोगावरील 'Damaged Goods' हें नाटक वाचलें कीं या प्रश्नावर पुष्कळ प्रकाश पडतो. दोघांही लेखकांनीं आपले विषय निव-डले ते निव्वळ क्षोभ उत्पन्न करून आपलीं पुस्तकें खपावींत म्हणून नव्हे. कळवळून आणि तळतळून लिहिलेलें लेखन कोणतें हें वाचकाला सहज कळूं शकतें. दोघेही हाडाचे समाजसुधारक आहेत. अनीतीच्या गर्तेत, अधःपाताच्या चिखलांत रुतून पडलेल्या निरपराधी तरुणींचीं चित्रें रेखाटायला अंतःकरण किती हळुवार असायला पाहिजे ? उपदंशाच्या रोगाचे सामाजिक दुष्परिणाम सुंदर रीतीनें पटवून देणें किती नाजूक-पणाचें व कौशल्याचें काम आहे ! पण क्यूप्रिन व ब्रिओ यांना त्यांत यश मिळालें याचें कारण त्यांचा वैयक्तिक दृष्टिकोन निश्चित झाला होता हें होय. ते ललितलेखक आहेत. पण केवळ विकारवश होऊन लिहिणारे, सामान्य वाचकांच्या भडक भावनांना उत्तेजित करून लोकप्रियता मिळविणारे अगर बाजारांत मालाला मागणी आहे म्हणून तो पुरविणारे धंदेवाईक लेखक ते नाहींत ! बुद्धिवादाच्या भूमिकेवर उभे राहून, सूक्ष्म दृष्टीनें समाजाचें निरीक्षण करून, समाजाच्या मार्गदर्शनाची जबाबदारी आपल्यावर आहे हें जाणून सौंदर्य व सत्य यांचें सुरस संमिश्रण करणारे ते शब्दसृष्टीचे ईश्वर आहेत. क्यूप्रिनच्या कादंबरींत वेश्यागृहांचीं, वेश्यांचीं, त्यांच्या शयनमंदिरांचीं–फार काय त्या शयनमंदिरांत पाऊल टाकून वेश्येशीं प्रणयचेष्टा व विलास करणाऱ्या तरुणांचीं सूक्ष्म चित्रें आहेत. पण या चित्रां-मुळें वाचकांचें मन क्षणभर सुद्धां विकारवश होत नाहीं. उलट त्याला

विचाराचे धक्के मिळत असतात. याचें कारण क्यूप्रिनचा स्वतःचा प्रभावी व उदात्त असा दृष्टिकोन हेंच आहे. कादंबरीच्या शेवटीं तो म्हणतो:—

"What is your plan to avert that sexual hunger which, with such force, possesses mating men ?"

I answered as best as I could—

"Coarse bed linen: a hard couch: a blanket neither thick nor over heating: a rigorously ventilated, cool bed-chamber. A sleep sound, not too prolonged and an early awakening; cold tubs or showers; food simple and unsophisticated with high seasonings; good literature-with manly heroic works for choice; a very great deal of work and play in the open air; Co-education of boys and girls. Finally an early marriage at twentyfive, say. For, after all, respectable girls do endure it until that age."

या उताऱ्यांत व्यक्त झालेली विचारसरणी पंडित सातवळेकराच्या पुरुषार्थांतून क्यूप्रिननें घेतलेली नाहीं, हें आमच्याकडील कांहीं नवनीतिवाद्यांच्या समाधानार्थ नमूद करणें जरूर आहे.

क्यूप्रिन व ब्रिओ याच्या या ललितकृती कलेच्या दृष्टीनें सर्वस्वीं निर्दोष आहेत असें माझें म्हणणें नाहीं. पण त्यांच्यात व्यक्त झालेले वैयक्तिक दृष्टिकोन व सूक्ष्म निरीक्षण हे गुण आजच्या मराठी लेखकाना निःसंशय अनुकरणीय वाटतील. ललितवाङ्मय सहेतुक असावें याचा अर्थ त्यातील विषयाचें अक्कड कडवें पुनःपुन्हां घोळून म्हणावें असा मुळींच नाहीं. प्रवासाला निघालेला मनुष्य आपल्या तिकिटाकडेच सारखा पाहत बसला तर मार्गावरील सौंदर्याला पारखे होण्याचा मूर्खपणा केला असें आपण म्हणूंच कीं नाहीं? पण प्रवासाला निघालेल्या मनुष्याचें इष्ट स्थान जसें निश्चित असतें, तसें ललितकृतींतही हेतूचें अदृश्य सूत्र असण्यात गैर असें काय आहे? समाजाच्या बाल्यावस्थेंत ललितकृती हेतुशून्य असूं शकतील. पण जों जों मानवी मनाची प्रगति होत जाते तों तों समाज अधिक बुद्धिवादी होतो. अशा बुद्धिवादी समाजाला निर्हेतुक कलाकृतीनें मोहिनी पडायला तिच्यांतली कला खरोखरच अलौकिक असायला पाहिजे. गायना-

सारख्या कलांची लेखनकलेशीं तुलना करून हा मुद्दा अनेकदा लढविला जातो. पण गायनात 'नादिर दिरदा' सारख्या अक्षरानीं भरलेल्या तराण्यानें करमणूक होते, म्हणून तशींच अक्षरें लेखनात जुळविलीं तर वाचक क्षणभर तरी गप्प बसतील काय ?

## कलाचातुरी

रचनाचातुर्याला तंत्र हा शब्द मराठींत रूढ झाल्यापासून अनेकांच्यावर मंत्रतंत्राचा प्रयोग झाल्याचा भास होत आहे. तंत्र म्हणजे एक नवें थोतांड आहे असें त्याचें म्हणणं! गाणारा कितीही उत्तम असला तरी तबल्याची साथ त्याला उपकारक होते हे ध्यानात घ्यायलाच हे लोक तयार नसतात. भैरवी झाली कीं गाणें संपलें ही गोष्ट सामान्य श्रोत्यालासुद्धां ठाऊक असते. पण 'तंत्र, तंत्र! सूड, सूड!' म्हणून ओरडणारे हे श्रोते जर एखाद्या मैफलीला मिळाले तर भैरवीनंतर अडाणा ऐकण्याचाही ते हट्ट धरून बसायचे! रचनाचातुरी ही टापटिपीच्या पोषाखासारखी आहे! प्रसंगीं सामान्य लेखनाला ती आपल्या कुशलतेनें सुंदर बनवीलही! पण अपवादात्मक अनुभव सोडून दिले तरी ललित-लेखकाच्या इतर गुणांना तिच्यामुळें आकर्षक स्वरूप प्राप्त होतें यात संशय नाहीं.

## रस्ता बंद आहे

या विधायक कार्यक्रमाप्रमाणें थोडेसें विनाशक काम केल्याखेरीज ललित लेखकाची कृति निर्दोष होऊं शकत नाहीं. ललितलेखनाचा विस्तार कशामुळेहि होवो; त्याचें मूळ आत्मव्यक्तीच्या उत्कट इच्छेंतच असावे. मूल चालूं लागतें तेव्हां त्यानें पांगुळगाड्याचा आधार घेतला तर तें शोभून दिसतो. पण मोठेपणीं तें दृश्य हास्यास्पद नाहीं का वाटणार ? अंध अनुकरण हा होतकरू ललित लेखकाच्या मार्गातला मोठाच खड्डा असतो. केशवसुतानीं तुतारी फुंकली ती खऱ्याखुऱ्या आवेशाने. पण तिचे सूर ऐकून ज्यांनीं स्वस्थपणानें निरनिराळीं वाद्ये वाजविलीं त्यांचे सूर लोकांच्या अंतःकरणाला जाऊन भिडले नाहींत तर त्यात दोष कुणाचा ?

तुतारीनंतर डंके, नौबती, कर्णे वगैरे सर्व वाद्यें खलास झाल्यामुळें आजच्या विडंबनयुगांतील एखादा कवि असेंहि म्हणेलः—

"एक फुंकणी द्या मज आणुनि
फुंकिन मी जी स्वप्राणानें
टाकिन भेदुनि चूल सोधणें
दीर्घ जिच्या त्या किंकाळीनें
अशी फुंकणी द्या मज आणुनि ॥"

कथावाङ्मयांतही प्रेमभंग, वेश्यांच्या उद्धाराची तळमळ वगैरे अनेक विषय असेच हाताळून हास्यास्पद करून ठेवलेले आढळतील. गोमंतकीय लेखकांना मुंबईबाहेरील महाराष्ट्रीय समाजाचे अनुभवही असण्याचा संभव कमीच! अशा वेळीं लोकप्रिय महाराष्ट्रीय लेखकांचें अनुकरण करण्याचा मोह होणें कितीहि स्वाभाविक असलें तरी त्यांनीं तो दूर झुगारून दिला पाहिजे. प्रेमवाङ्मय वाचून मुली परधर्मीय पुरुषांशीं लग्न करतात असें सांगणाऱ्या पुराण–पुरुषांचें तोंड पुराणांनींच बंद करतां येईल. पण प्रेम-गीतें अगर प्रेमकथा खपतात म्हणून लिहायच्या यांत काय अर्थ आहे? कृत्रिम रंगापेक्षां जिव्हाळ्याच्या अनुभवांनीं दिलेले रंगच पक्के असतात. आजच्या गोमंतकाच्या समाजांत जो प्रणय जनांत दिसत असेल अगर मनांत वसत असेल, त्याचें अवश्य चित्रण होऊं द्या. पण त्या चित्रणांत अतिरंजन असूं नये. गरिबांविषयीं कळवळा वाटणें हा कांहीं ललितलेखकाचा दोष नव्हे. पण वरेरकरांसारख्या पहिल्या दर्जाच्या लेखकानें, 'नर्स' या गोष्टींत परीक्षकानें एका बालविधवेपाशीं परीक्षेंत पास करण्याकरितां शीलाचा मोबदला मागि-तला व तिनें तो न दिल्यामुळें तिला आत्महत्या करावी लागली असें दाखविलें आहे. खरोखरच अशी एखादी गोष्ट घडलीहि असेल. पण ती अशी मांडण्यांत कला कुठें आहे? सारेच परीक्षक असे असतात काय? ते तसे असल्यास असल्या करुणकथा टाळाव्यात म्हणून उपाय काय करायचे? पूर्वी राजाच्या अंतःपुरावर कंचुकी नेमीत असत तशी तर परीक्षकांची निवड करायची नाहीं? सर्वस्पर्शित्व हा कलेचा महत्त्वाचा गुण असतो हें वरेरकर विसरले आणि त्यामुळें कुठेंतरी ऐकलेली गोष्ट जशीच्या तशी लिहून गेले.

व्यक्तीच्या दृष्टीनें एखादी कथा सत्य असेल. पण कलेची सत्याची कसोटी इतकी कडक असते कीं तिच्या दृष्टीनें ती असत्य ठरल्यावांचून राहणार नाहीं.

या सर्व खड्डयांकडे जाणाऱ्या रस्त्यांवर पाऊल टाकण्याचें गोमंतकीय लेखकांना कारणच नाहीं. त्यांचा मार्ग स्वतंत्र आहे. त्यांची सृष्टि, त्यांचा समाज, त्यांचे अनुभव हे महाराष्ट्रापेक्षां भिन्न असल्यामुळें कलागुणांची उपासना करून ते जिव्हाळ्यानें आत्मव्यक्ति करतील तर त्यांचें वाङ्मय प्रादेशिक म्हणूनच नव्हे, तर संपन्न म्हणून महाराष्ट्रांत मान्यता पावेल.

## वाङ्मयांतील जिवबादादा

शिक्षण ही सरस्वतीची पूजामूर्ति म्हटली तर साहित्य ही उत्सवमूर्ति आहे. या दोन्ही मूर्तींच्या पूजनाकरितां गोमंतकीय बांधव वर्षानुवर्षे जो त्याग करीत आले आहेत त्याची जाणीव महाराष्ट्राला पूर्णपणें झाली आहे. ऐतिहासिक कालांत गोमंतकांतील जिवबादादा बक्षींनीं ग्वाल्हेर-सारख्या ठिकाणीं जाऊन अभूतपूर्व पराक्रम केला. आज ना उद्यां गोमंतकाच्या वाङ्मयसेवकांतील श्रेष्ठ कलावंत महाराष्ट्र–साहित्य–संमेलनाचा अध्यक्ष होऊन ती परंपरा चालू ठेवील यांत मला तरी संशय वाटत नाहीं. तो दिवस लवकर उगवो अशी शुभेच्छा प्रगट करून गोमंतक हें केवळ सृष्टिसौंदर्याच्याच नव्हे, तर साहित्यसौंदर्याच्या दृष्टीनेंही महाराष्ट्राचें नंदनवन होवो असें आपल्या वतीनें मी सरस्वतीपाशीं मागणें मागतों.



शारदोपासकांचें या वेळीं भरणारें संमेलन म्हणजे शारदेची वसंत-पूजाच होय. ज्याच्या वक्तृत्वांत कोकिलेचें माधुर्य अगर ज्याच्या लिखा-णांत आम्रफलांची रसवन्ती असेल त्याच्याकडेच अशा पूजेचें पुढारीपण असणें अधिक इष्ट. सुवासिक वसंतव्याख्यानमालेच्या रूपानें शारदेची जिथें पूजा केली जाते तिथें तिला दाखवावयाचा नैवेद्यही तितकाच चांगला असावयास नको का ? वसंतकाल हा टांगेवाला, आचारी आणि कवि यांच्या भावांना बरकत आणतो असें म्हणतात. पण माझ्यासारख्या गद्य मनुष्याला त्याचा काय उपयोग ? तथापि अमसुलाचें सार उंसाच्या रसा-इतकें गोड मानून घेण्याचें औदार्य आपणांमध्यें आहे हें उघड उघड दिसत असल्यामुळेंच मी आपण दिलेल्या स्थानाचा कृतज्ञतापूर्वक स्वीकार करीत आहें.

## आपलें पुणें

मी स्वतः कोणत्याहि अर्थानें पुणेंकर नाहीं. पण पुण्याविषयीं मला नेह-मींच आदर वाटतो. पुणें हें महाराष्ट्राचें माहेरघर आहे असें मीं म्हटलें, तर लगेच 'छेः छेः! तिथं साऱ्या महाराष्ट्राला सासुरवास भोगावा लागतो,' असे उद्गार काढणारे तीर्थस्वरूप वाङ्मयसेवक मला ठाऊक आहेत. पुणें हें महाराष्ट्राचें काळीज आहे असें म्हणावें तर 'कबूल! पण तें उलटें

आहे'! अशी कोटीहि कदाचित् त्यांना सुचायची! पण पुण्यपुरीगंडानें ग्रस्त झालेल्या लोकांनाही पुण्याचें वैचित्र्य मनोरंजक वाटेल यांत संशय नाहीं. विनोदानेंच बोलायचें तर सोट्या म्हसोबा, पत्र्या मारुती, खुन्या मुरलीधर इत्यादि विविध व विलक्षण पदव्या धारण करणारे देव दुसऱ्या कुठल्या तरी गांवांत सांपडतील का? इथें अग्निहोत्रमंदिराप्रमाणें बंडगार्डन आहे आणि यंग सोशालिस्ट लीगच्या जोडीला पेन्शनरांचें विश्राममंडळही आहे! टिळकस्मारकमंदिराइतकाच श्रोतृवर्गाचें स्वागत करण्याला उत्सुक असा गोखलेहॉलही येथें आढळतो. मोटारी व टांगे, संध्याकाळीं देव-दर्शनाला जाणाऱ्या प्रौढ स्त्रिया आणि फिरायला जाणाऱ्या तरुणी, विटी-दांडू व टेनिस, आंबे आणि अंजीर यांच्यांपैकीं कुणाचें प्रमाण येथें अधिक आहे हें सांगायला आंकडेशास्त्रज्ञच हवा. सहज मौजेनें उल्लेख केलेल्या या गोष्टींपेक्षां पुण्याचें महत्त्व सिद्ध करणाऱ्या अनेक गोष्टींचा नामनिर्देश करणें शक्य आहे. पण या संमेलनाच्या निमित्तानें एक आणा किंमतीचें पुणेंवर्णन लिहिणें योग्य होणार नाहीं. शिवाय पर्वताच्या शिखराप्रमाणें मोठ्या गोष्टी दुरूनहि दिसतात; त्या कांहीं मुद्दाम दाखवाव्या लागत नाहींत.

पुण्यांतल्या नुसत्या संस्थांची नामावलि वाचली, तरी या शहराची सर्वसंग्राहकता लक्षांत येते. कांहीं प्रदेशांत विशिष्ट झाडेंच वाढतात; कांहींत सर्व तऱ्हांच्या वृक्षवेलींचा विकास होतो. पुण्याची भूमि ही दुसऱ्या तऱ्हेची आहे. महाराष्ट्रांतले सर्व विचारप्रवाह इथें एकत्रित झालेले दिसतात. या विविध प्रवाहांच्या संगमाचा जसा एक फायदा तसा एक तोटाहि असतोच. शेंकडों गोड नद्यांनीं आपलें पाणी ओतलें तरी समुद्र खारटच रहायचा! विविधता व व्यापकता यामुळें विशिष्ट विचारसरणीची उत्कटता प्रसंगविशेषीं येथें आढळत नाहीं यांत नवल नाहीं! समुद्राच्या जल-विस्ताराचा उपयोग पिण्याकरितां करायचा नसतो, तर दळणवळणाकरितां! तें पाणी प्यायचेंच असलें तर तें आकाशांत जाऊन गोड होऊन यायची वाट तरी पहायला पाहिजे!

पुण्याविरुद्ध घेण्यांत येणारा मुख्य आक्षेप म्हटला म्हणजे, बाहेरच्या महाराष्ट्राविषयींची उपेक्षाबुद्धि हा होय. पुणेरी लेखकाच्या सामान्य पुस्तका-

वर त्वरित अभिप्राय यावा, पण बाहेरचें पुस्तक मात्र संपादकाच्या टेबला-
वर ( किंवा कुणाच्या तरी घरीं ) लोळत पडलेलें असावें असे अनुभव
कुणालाच आले नसतील, असें मी म्हणत नाहीं. पण एक तर स्थानिक
लेखकाला सत्याग्रह करण्याची संधि सहज मिळते. संपादक कुठेंही सांप-
डले तरी 'अभिप्राय केव्हां देणार' या महाकाळीचा भडिमार तो त्यांच्या-
वर करूं शकतो. बाहेरच्या लेखकानें तसें करायचें मनांत आणलें तर प्रवा-
साच्या खर्चांतच त्याला मिळालेला लेखनाचा मोबदला खलास व्हावयाचा.
बाहेरच्या लेखकांच्या बाबतींत विशेष अगत्य दर्शवून हें वैगुण्य पुण्यांतील
नियतकालिकांना सहज दूर करतां येण्याजोगें आहे. उभयपक्षीं दळणवळण व
स्नेहसंबंध वाढले म्हणजे गैरसमजाचीं कारणें आपोआपच दूर होतात. 'हजीर
तो वजीर' या न्यायानें परक्यांचा डोळयांवर येणारा पक्षपात कांहीं वेळां
इथें नकळत घडत असेल. पण तो दूर करण्याचा उपाय म्हणजे इतरांनीं
आपलें राजेपण पटवून घेणें हाच आहे. शिवाय स्थानमहात्म्यामुळें कांहीं
गोष्टींत फरक पडायचाच ! पर्वतशिखरावर भर दुपारीं वाहणारा गार वारा
त्याच वेळीं सपाट भूमिभागाला कुठून मिळणार ? सकारण व अकारण
उत्पन्न होणारी ही विषमतेची भावना येथें शारदोपासकसंमेलन प्रतिवर्षी
भरत राहील तर बरीचशी कमी होईल असें वाटतें. गैरसमजाच्या जंतूंचा
नाश वेळेवर झाला नाहीं, तर ते भयंकर सांथ उत्पन्न करतात. अशा
सांथीला आळा घालणें हें येथील वाङ्मयसंस्थांचें कर्तव्यच ठरतें. त्या
दृष्टीनें मध्यंतरीं खंडित झालेला शारदोपासकसंमेलनाचा हा कार्यक्रम
आपणा सर्वांना स्वागतार्ह वाटेल अशी आशा आहे.

## नवें युग, नवी शारदा

आपण सर्व शारदेचे उपासक आहोंत हें उघडच आहे. पण ज्या शार-
देची आपण भक्तिभावानें पूजा करतों ती कुठली ? तिचें स्वरूप अलीकडे
फार झपाट्यानें बदलत असल्यामुळें नीति अगर एकादशी यांच्याप्रमाणें
शारदादेवीचेंही एक जुनें व एक नवें अशीं दोन रूपें होतात कीं काय,
अशी कित्येकांना भीति वाटूं लागली आहे. पूर्वीची शारदा 'या कुन्देन्दु-
तुषारहारधवला या शुभ्रवस्त्रावृता' अशी होती. पण हल्लीं ती काळवेळ पाहून

आणि रंगसंगति पाळून दिवसांतून चार प्रकारचीं पातळें परिधान करूं लागली आहे. हातांतली वीणा तर तिनें कधींच टाकून दिली. कालमानानुसार तिला ती पेलतही नसेल ! आतां तिच्या हातांत अलगुज अगर फौंटनपेनच शोभतें. पांढऱ्या कमळांतली तिची बैठक तर कधींच जुनी झाली. आतां ती मखमलीच्या कापडानें आच्छादिलेल्या आरामखुर्चीत बसलेली दिसते. पूर्वी ब्रह्मा–विष्णु–महेश तिला वंदन करीत असत. पण हल्लीं ती वाटेल त्या तरुणाबरोबर आनंदानें हस्तांदोलन करतांना आढळते. 'निःशेषजाड्या पहा ' हें एकच जुनें विशेषण काय तें या नव्या शारदेला लागूं पडेल. पण ती जाड्य नाहींसें करते तें बहुधा शरीराचें, मनाचें नाहीं.

शारदेच्या नव्या स्वरूपाविषयीं असा तक्रारअर्ज करणारांना विनोदानें कुणीही विचारील, ' काय हो ? शारदेच्या बदलत्या वेषावरच तुमचा एवढा कटाक्ष कां ? तिचे पतिराज तरी कुठें जुन्या परंपरेला चिकटून राहिले आहेत ? गणेशोत्सवांतल्या गणपतीच्या विविध मूर्तीकडे पहा. ज्या मूर्तीच्या साक्षीनें स्वदेशी वस्तु वापरण्याचा उपदेश केला जातो, ती मूर्तीच परदेशी मायकलवर बसलेली आढळते. चहांतलें टॅनिन अगर तंबाखूंतलें निकोटिन किती घातक असतें हें त्या बुद्धिदात्या देवाला कळत नाहीं, असें कसें म्हणावें ? पण तो पुष्कळदां चहाचा पेला अगर सिगारेट तोंडाला लावीत असलेला दिसतो. वेषभूषेच्या नव्या हौशी, पुरुषांपेक्षां बायकांतच अधिक पसरायच्या ! जिथें गणपतीची ही स्थिति झाली आहे, तिथें शारदेचें स्वरूप बदललें म्हणून तक्रार करण्यांत काय अर्थ आहे ? '

## मराठीचें मावळतें युग

शारदेच्या स्वरूपांत होणाऱ्या स्थित्यंतराचें समर्थन विनोदाइतकेंच गंभीरपणानें करतां येईल. साठ वर्षांचें चक्र फिरलें कीं नवयुगाला सुरवात होते असें म्हणतात. मराठी वाङ्मयांतील चिपळूणकर–आगरकर युगाचा जन्म १८७४ त झाला. १८७४ पासून १९३४ पर्यंतच्या या कालाचे वीस वीस वर्षांचे तीन खंड पडतात. पहिला भाग १८७४–९४ चा; या काळांत महाराष्ट्रांत राजकीय व सामाजिक विचारांचें नवें वारें वाहूं लागलें. मराठी भाषेचें आकर्षक पण गंभीर असें नवें स्वरूपही

याच काळांत तयार झालें. आगरकरांचा मृत्यु व आपटे-राजवाडे-परांजपे-कोल्हटकर–खाडिलकर–केळकर इत्यादिकांचा उदय हीच पहिल्या व दुसऱ्या विभागांतील सीमारेषा होय. १८९४ ते १९१४ च्या दुसऱ्या कालखंडांत भाषेला विविध कल्पकतेची जोड मिळून तिचा नव्यानव्या क्षेत्रांत रमणीय संचार झाला. पण या काळांतील राजकीय व सामाजिक प्रगतीचे विचार मागच्या कालखंडापेक्षा फारसे भिन्न नव्हते. या कालखंडाच्या शेवटीं निर्माण झालेला 'गीतारहस्य' ग्रंथ पाहिला कीं, 'भांडें नवें, पण पेय जुनें' अशीच त्यावेळची स्थिति होती, असें दिसून येईल. १९१४ ते १९३४ या विभागाला जागतिक दृष्टीनें पहायचें तर महायुद्धानें व मराठी वाङ्मयाच्या दृष्टीनें बोलायचें तर गडकरी, वामनराव जोशी, वरेरकर वगैरेंच्या उदयानें सुरवात झाली. भाषेला लालित्याची व रचनेला विविधतेची जोड या कालखंडांत मिळाली. यावेळीं पहिल्या कालखंडांतील विचार आचारांत येऊन गेले होते. त्यामुळें समाजाचें स्वरूप बदलून नवे कूटप्रश्न उत्पन्न झाले. त्यांतच महायुद्धानंतर घडलेल्या जागतिक घडामोडींचे प्रतिध्वनि ऐकूं येऊं लागले. केवळ वाङ्मयीन दृष्टीनें पाहिलें तरी शेक्सपीअर, मोलीअर, डिकेन्स, स्कॉट, वर्डस्वर्थ, शेले हे जुने आदर्श बाजूला सारून इब्सेन, शॉ, गॅल्सवर्दी, वेल्स, हार्डी इत्यादि नवे आदर्श पुढे घेण्याची प्रवृत्ति या काळांत बळावली. या नवीन ग्रंथकारांपैकीं बहुतेक कलावंत असून विचारवंतही असल्यामुळें या कालखंडांत पूर्वीच्या दृढमूल विचारसरणीला नवेनवे धक्के बसूं लागले. राजकारणांत जुन्या मार्गानें मिळवावयाच्या स्वराज्याला समाजवादाचा शह मिळाला, तर सामाजिक बाबतींतील नीतीचा बालेकिल्ला जो स्त्री–पुरुष प्रेम त्याच्यावर फ्रॉइडच्या अंतर्मनाच्या संशोधनानें निराळ्याच दिशेनें मोर्चे चढविले. वाङ्मय निर्माण करणारा पांढरपेशा वर्ग पहिल्या दोन कालखंडांत सुस्थितींत असल्यामुळें कल्पनारम्यतेंत त्याला आनंद वाटला हें स्वाभाविकच होतें. पण तिसऱ्या कालखंडाच्या उत्तरार्धांत या वर्गाची आरामखुर्ची मोडून गेल्यामुळें, त्याला मिळेल तसल्या ओल्याकोरड्या जमिनीवर बसण्याची पाळी आली. या डळमळत्या परिस्थितींत स्वतःच्या दोन हातांनाच जिथें कशाचा आधार नाहीं, तिथें दोन हाताचे चार हात करून घेण्याचा तरुणांना धीर होणार तरी कसा?

१८७४ पासून १९३४ पर्यंतच्या साठ वर्षांतील तीन कालखंडांत विचार, कल्पना व कला याचें नाविन्य अनुक्रमानें मराठींत आलें. आतां पुन्हां विचाराचें चक्र जोरानें सुरू झालें आहे व त्याच्या अनपेक्षितपणामुळेंच शारदादेवी केंस कापून हातांत रॅकेट घेऊन सायकलवरून टेनिस खेळायला जात असल्याचा भास अनेकांना होत आहे.

## कल्पनारम्यतेचा पगडा

पण खरें सांगायचें तर तो अजून भासच आहे. मराठी वाङ्मय अजून कल्पनारम्यतेच्या आसपासच घुटमळत आहे. वादळी समुद्राकडे पाठ फिरवून मृगजळाची शोभा पाहण्यांतच तें बहुधा गुंग झालेलें दिसतें. आपल्यांतील अग्रगण्य लेखकांच्या अगदीं कालपरवांच्या ललितकृति पहा-व्यात. त्यांतले कितीतरी समरप्रसंग नाटकी वाटतात. रक्ताची किंमत तांबड्या शाईहून अधिक न मानणाऱ्या कृती वाचकाचें रक्त उचंबळवूं शकत नाहींत यांत अस्वाभाविक असें काय आहे ? हिंदु मुसलमानांच्या संबंधावर लिहिलेली, प्रख्यात कलावंत कादंबरीकार प्रो. फडके यांची 'अटके-पार' कादंबरीच घ्या. अटकेपार जाण्याकरितां आधीं अटकेपर्यंत जावें लागतें याची जाणीव ती वाचून क्षणभर तरी होते कां ? हिंदु–मुसलमानांच्या वादाचा निकाल या भिन्नधर्मीय नायकनायिकांच्या लग्नांनीं लागण्यासारखा असता, तर कितीतरी बरें झालें असतें ! या कादंबरींतली नायिका मीनाक्षी हिला तर मारून मुटकून मुसलमान बनविलेली दिसते. पुढें तिचें एका हिंदु तरुणावर प्रेम जडणार आहे हें कादंबरीकाराला ठाऊक असल्यामुळें त्यानें लहानपणापासून तिला मांसनिवृत्त ठेवण्याची दक्षताहि बाळगली आहे. पण या दक्षतेचा तरी लग्नाच्या कामीं कुठें उपयोग होतो ? आयत्यावेळीं नाय-काला तार आणि नायिकेला ताप येऊन कादंबरी दुःखान्तच होते. या दोन विरोधी समाजांच्या संघर्षणाच्या ठिणग्या सबंध कादंबरींत कोठेंच आढळत नाहींत. उलट सुगंधानें दरवळलेल्या प्रणयपुष्पांचा सडा मात्र पडलेला दिसतो ! अधिक जवळून पाहिलें तर, अनेकदां यांतील सुगंध अत्तराचा आणि फुलें कागदी आहेत, असा अनुभव येतो. नायक सुधीर व नायिका मीनाक्षी यांच्या भेटीचे सर्व प्रसंग एकामागून एक मांडले

म्हणजे आपण विसाव्या शतकांतील हिंदुस्थानांत नसून थिऑसफी हा राष्ट्रधर्म मानणाऱ्या एखाद्या देशांत अगर हरून–अल–रशीदाच्या बगदाद शहरांत आहों असें एखाद्याला वाटलें तर त्यांत त्याची चूक कसली ?

दुसरें उदाहरण सध्यांचे श्रेष्ठ नाटककार वरेरकर यांच्या कृतींचें. गेल्या तीन वर्षांत त्यांचीं 'सोन्याचा कळस' व 'स्वयंसेवक' हीं सामाजिक नाटकें रंगभूमीवर आलीं. 'सोन्याच्या कळसा'चा विषय म्हणजे साऱ्या जगाला सध्यां महत्त्वाचा वाटणारा प्रश्न. भांडवलवाले, गिरणीमालक व कामकरी मजूर यांच्यांतला लढा मिटविण्याकरितां वरेरकरांनीं अगदीं सोपी युक्ति शोधून काढली आहे. ती म्हणजे गिरणी–मालकाच्या मुलानें वेषांतर करून मजूर व्हायचें, मजुरांचें पुढारीपण पतकरायचें आणि संपाच्या वेळीं गोळीबाराचा प्रसंग आला कीं कामगारांचा पुढारी झालेल्या या मुलाला पाहून बापानें माघार घ्यायची ! यांपैकीं कुठली गोष्ट अधिक अशक्य आहे हें ठरविण्याकरितां कमिटी नेमण्याची पाळी खास येणार नाहीं. गुजराथी गिरणी–मालकाचा दररोज घी–शक्कर खाणारा मुलगा गिरणींत संप होण्याच्या आधीं मजुरांच्या चाळींतील कांदा–भाकरीला कंटाळूनच घरीं परत येण्याचा संभव अधिक. आरामखुर्चीत पडून कादंबऱ्या वाचण्यापलीकडे अधिक श्रमाचीं कामें ज्यानें केलीं नसतील, त्याला गिरणींतलें कष्टाचें आयुष्य दोन दिवसांपेक्षां अधिक काळ कंठणें शक्य आहे काय? या नाटकात पहिल्या अंकाच्या शेवटीं नायक मूळ रूपांत नायिकेला भेटून जातो त्या वेळीं काश्मीरची हवा मानवल्याइतकी त्याची प्रकृति इतरांना चांगली दिसते. गिरणींतलें आयुष्य जर इतकें सुखाचें असेल, तर मग तें बदलण्याची धडपड तरी कशाला हवी ?

'स्वयंसेवक' नाटकांतही हाच प्रकार आढळतो. त्याचा विषय सावकाराकडून होणारी गरिबाची नाडणूक व पिळणूक; पण त्याला स्वरूप दिलें आहे गुलामगिरीचें. या नाटकांतील कॉलेजांत जाणारा नायक, वाचण्याकरितां पुस्तकें मागून नेल्यानें स्वाभिमान नाहींसा होतो, म्हणून तीं चोरून नेतो. पण इतक्या अभिनव विचाराचा हा तरुण बापानें गुलाम म्हणून विकतांच मुकाट्यानें सावकाराच्या घरीं जातो. जणुं कांहीं हरिश्चंद्र व रामचंद्र

यांनीं पुरून ठेविलेलें पूर्ण सत्य यालाच सांपडलें होतें ! पुढें पिस्तुलाचा प्रताप, नायकावर आलेला खोटा आरोप, त्याचा तुरुंगवास, त्या तुरुंगांतून त्याला सोडविणारा कृतज्ञ शिपाई, ही प्रसंगांची मालिका पाहून आपण सामाजिक कल्हई काढलेलें एखादें ऐतिहासिक भांडें तर पाहत नाहींना अशीहि एखाद्याला शंका यायची.

केळकरांची 'नवलपूरचा संस्थानिक', वामनराव जोश्यांची 'इंदु काळे व सरला भोळे' आणि अन्यांचें 'घराबाहेर' हें नाटक या ललितकृती घेतल्या तरी जुन्या व नव्या पिढींत एकाच गोष्टीची उणीव दिसून येते. ती म्हणजे सत्याच्या सूर्याकडे डोळे न दिपूं देतां सतत पाहण्याची शक्ति होय. केळकरांच्या कादंबरींतील दिवाणापासून कॉमरेड डंखीपर्यंतचीं पात्रें प्रातिनिधिक स्वरूपाचीं नसलीं तरी तीं त्यांना कुठें ना कुठें तरी दिसलीं असतील. पण त्यांचा नवलपूरचा संस्थानिक? हिंदुस्थानांतील साऱ्या संस्थानिकांचे सद्गुण एकत्रित केले तरी कादंबरींतील नवलरायाचें पारडेंच जड झाल्याशिवाय राहणार नाहीं. असा सर्वगुणसंपन्न संस्थानिक निर्माण करण्यांत एक उच्च आदर्श लोकांपुढें ठेवण्याचा त्यांचा उद्देश असावा. पण आदर्श म्हटला तरी त्याच्या गुणधर्मांना कांहीं मर्यादा आहेच कीं नाहीं? आरशांत शरीराप्रमाणें मनाचें प्रतिबिंब दाखविण्याची शक्ति आहे असें कोणीं म्हटलें तर त्यावर विश्वास कोण ठेवील? शिवाय या आदर्शांचा काय उपयोग? सामान्य वाचकांना कांहीं संस्थानिक व्हायचें नसतें आणि संस्थानिकांना विविध उद्योगांपुढें कादंबऱ्या वाचायला फुरसद तरी कुठें असते?

'घराबाहेर' नाटकांतला विषय अगदीं आधुनिक असूनही त्याचें चित्रण लुटुपुटुच्या लढाईसारखें वाटतें. दहा वर्षेपर्यंत ज्या नवऱ्याला निर्मलेच्या जाचणुकीची कल्पना आली नाहीं, त्याच्याकडे ती शेवटीं परत जाते, याचें कारण 'मम निर्मला, अति निर्मला' हें पद तो म्हणतो, यापेक्षां दुसरें कांहीं दिसत नाहीं.' नाटककाराला शेवटीं आनंदीआनंद करायचा होता म्हणून त्यानें भय्यासाहेबासारख्या पापानें हात धुतलेल्या माणसाचें घर निर्मलेच्या वाटेंत उभें केलें. पण जर दुसऱ्या एखाद्या

सालस माणसाच्या सहवासांत राहण्याची संधि तिला मिळाली असती आणि त्याच्या निर्मल व निर्हेतुक प्रेमाचा आसरा तिला लाभला असता, तर नवऱ्याचा पांगुळगाडा हातांत घेऊन आयुष्याचें मार्गक्रमण करायला ती तयार झाली असती का ?

श्री. वामनरावजींची ‘ इंदु काळे व सरला भोळे ’ हा तर आजकालचा इतिहास आहे हें तिच्यांतील पत्रांच्या तारखांवरूनदेखील दिसून येईल. या कादंबरींत लेखकानें उपस्थित केलेले अनेक प्रश्न इतके कठिण आहेत कीं, हा पेपर सोडविण्यांतच समाजाचीं पांचदहा वर्षे जातील. पण कितीही मोकळेपणानें लिहावयाचें आणि यथार्थतेनें चित्रण करायचें म्हटलें तरी मराठी वाङ्मयावर कल्पनारम्यतेची छाया येतेच येते. या कादंबरींतील इंदूला असेंच गालबोट लागलें आहे. बिंदुमाधव हें पात्र निर्माण करून ग्रंथकर्त्यानें तें लावलें आहे असें मी म्हणत नाहीं. पण इंदूला एकीकडून अंधकलासक्त व दुसरीकडून परंपरागत नीतीची भक्त दाखवितांना या कात्रींत स्वाभाविकतेच्या मात्र चिंधड्या उडालेल्या आहेत.

केळकर, जोशी, वरेरकर, फडके, अत्रे वगैरे आजच्या अग्रेसर व लोकप्रिय लेखकांच्या अगदीं अलीकडच्या कृतींतदेखील कल्पनारम्यतेचें धुकें थोड्याफार प्रमाणांत पसरलेलें दिसावें, याचें कारण काय ? तीस वर्षांपूर्वीच्या कोल्हटकरांच्या अगर वीस वर्षांपूर्वीच्या गडकऱ्यांच्या नाटकांत तें दिसत होतें हें ठीक होतें. मराठी ललितवाङ्मयाच्या उदयकालीं तें शोभून गेलें. कोल्हटकरांच्या ‘ गुप्त मंजुषां’तली राणी स्वप्नावर विश्वास ठेवून सहा वर्षे नवऱ्यापासून दूर राहते व त्या काळांत मिळालेल्या वैद्यकीय ज्ञानाचा उपयोग करून, नवऱ्याची प्राणसंकटांतून मुक्तता करते. पण आजची नायिका एखादें स्वप्न पडलें तर त्याचा अर्थ लावण्याची खटपट न करतां अपचनाबद्दल डॉक्टरचा सल्ला घेईल. सहा वर्षे नवऱ्यापासून दूर राहण्याचा वेडा विचार तर तिला स्वप्नांतही सुचणार नाहीं. सहा वर्षांनीं परत येऊन सवत व तिचीं दोन मुलेंच पहावयाचीं असलीं तर त्यांत गोडी कसली ? नवऱ्याला प्राणसंकटांतून मुक्त करण्याचा उत्तम उपाय उत्कृष्ट डॉक्टराला आणणें हाच होय हेंहि

तिला कळतें. गडकऱ्यांच्या पुण्यप्रभावांतली नायिका आपली अब्रू घेऊं इच्छिणाऱ्या दुष्टाच्या हृदयांतील ईश्वर प्रकट होण्याची वाट पाहते. पण आजच्या सामाजिक दृष्टीनें पाहिलें तर असल्या नायिकेनें शक्य तर खलपुरुषाच्या हृदयांतील ईश्वरापेक्षां त्याच्या पोटांतील आंतडीं बाहेर काढावींत हेंच उत्तम.

अद्‌भुतरम्यता व कल्पनाविलास यांना अनुकुल अशा काळांत कोल्हटकर–गडकऱ्यांच्या कृति निर्माण झाल्या. पण गेल्या वीस वर्षांत काळ इतका पालटला आहे कीं, प्रसंगीं शतकांतसुद्धां इतका फेरबदल होत नसेल. शेंकडों उन्हाळ्यापावसाळ्यांचें काम धरणीकंपाचा एक धक्का करतो. महायुद्धानंतर उत्पन्न झालेली आर्थिक दुःस्थिति, तिच्या भीषण छायेखालीं स्तिमित होऊन बसलेली सुधारणा, आणि समाजमंदिराचा पायाच हादरूं लागल्यामुळें धांवपळ करणारी आंतली मंडळी यांना पाहून आतां कल्पनारम्यता आल्या पावलीं परत गेल्याशिवाय राहणार नाहीं.

### वाङ्मय व जीवन यांच्यामधील भिंत

परंतु अजून तिची जादू आमच्यांतल्या मोठमोठ्या लेखकांवर चालूं शकते ही दुर्दैवाची गोष्ट आहे. याचें मुख्य कारण वाङ्मय व जीवन यांच्यामध्यें आपण एक अभेद्य भिंत उभारली आहे हेंच होय. श्रीमंतांच्या सहवासांत राहतांना डोळे असून पहायचें नाहीं, कान असून ऐकायचें नाहीं, आणि तोंड असून बोलायचें नाहीं असा उपदेश होतकरू सेवकांना नेहमीं केला जातो. जीवनाच्या बाबतींत मराठी वाङ्मयसेवक कळत न कळत तोच आचरणांत आणतात कीं काय कुणाला ठाऊक! यामुळें पलीकडे जीवन आपल्या नित्यनूतन विविधतेनें नटत आहे आणि मधें प्रचंड भिंत असल्यामुळें अलिकडील वाङ्मयांत त्याची जुनीपुराणीं चित्रें रेखाटलीं जात आहेत असें दृश्य नेहमीं दृष्टीला पडतें. वाङ्मय व जीवन यांची फारकत करणाऱ्या या भिंतीला कान असतात; पण तोंड नसतें! केव्हां केव्हां या कानांची लांबीहि. अकारण वाढलेली दिसून येते! या भिंतीला कोनाडे आहेत; पण उखाण्यापेक्षां अधिक उच्च दर्जाचें वाङ्मय निर्माण करण्याचें त्यांच्यांत सामर्थ्य नाहीं. या भिंतीला खिडक्या आहेत;

दरवाजाही आहे. पण अंध संकेतांचे कडीकोयंडे आणि अकारण बंधनांचीं कुलुपें यांनीं जखडून गेलेलीं हीं लहानमोठीं दारें कांहींच हालचाल करूं शकत नाहींत. वाङ्मयविभागांतील एखाद्या व्यक्तीनें एखाद्या दरवाजाची कडी काढण्याचा थोडासा प्रयत्न केला, तरी तो खणखण आवाज मेघगर्जनेहूनही मोठा मानला जातो. क्वचित् एखादें दार चुकून किलकिलें होऊन, जीवनविभागांतील वाऱ्याची झुळूक आली कीं हें नवें वारें अनेकांना असह्य होतें. जणुं कांहीं वाऱ्याच्या झुळुकेनें वात होण्याइतकी वाङ्मयाची प्रकृति नाजुक असते !

समाजाचें खरेंखुरें जीवन व त्याचें वाङ्मय यांच्यामध्यें अशी भिंत असल्यामुळेंच आपल्या वाङ्मयावर सत्यापेक्षां सांकेतिक गोष्टींचाच पगडा बसलेला दिसून येतो. ज्याच्या दारांत सुरंगीचें झाड व मागच्या बाजूला कमळांनीं भरलेलें तळें आहे अशा ठिकाणीं कोंकणांतल्या कवीला प्रियेवर काव्य लिहायला बसवावें. 'भ्रमर जसा कमलिनीवर लुब्ध होतो तसा, हे इंदुवदने, मी' इत्यादि इत्यादि गोष्टी तो लिहील. तळ्यांतल्या कमळां-पेक्षां सुरंगीच्या फुलांवरच भुंगे झटून उड्या घालतात ही गोष्ट त्यानें डोळ्यांनीं पाहिली असली, तरी परंपरागत उपमा बदलण्याशीं तिचा काय संबंध ? इष्ट माणसाची 'चातकाप्रमाणें वाट पाहणारी' मंडळी तर नाटकें कादंबऱ्यांत आपणांला नेहमींच आढळतात. चातकाचें चित्र काढणारालाच प्रियजनाची भेट होईल अशी जर अट कुणीं घातली, तर त्यांपैकीं सर्वांना जन्मभर निराशेचे निःश्वास सोडीत बसावें लागेल. अमृ-ताचा आमच्या वाङ्मयांतील धुमाकूळ तर विचारूंच नका ! ज्ञानेश्वरा-पासून तों काल आज कविता लिहायला लागलेल्या कवींनींच नव्हे, तर गद्य लेखकांनींहि त्याचा इतका सुकाळ करून सोडला आहे कीं, ज्याच्या-साठीं देवदानवांचें युद्ध झालें तें दुर्मिळ व निर्मळ अमृत हेंच काय अशी वारंवार मनाला शंका येते.

वाक्प्रचारांहून अधिक खोल गेलें तर संकेतांनीं आपल्या वाङ्मयाला आणलेलें कृत्रिम स्वरूप अधिकच स्पष्टपणें दिसून येईल. आईचें स्वभाव-चित्रण करावयाचें म्हटलें कीं, 'न मातुः परदैवतम्' या सूत्राला अनुसरूनच

तें आमच्या वाङ्मयांत झालें पाहिजे. प्रसंगविशेषीं आपल्या दुधावर वाढविलेल्या मुलाच्या आयुष्यांत आई अज्ञानानें विष कालवूं शकते ही गोष्ट ऐकण्यापेक्षां बहिरें झालेलें काय वाईट अशी आमची कल्पना! प्रेमाविषयींच्या सध्यांच्या वाङ्मयिक कल्पना घ्या. त्याही ठराविक ठशाच्या! प्रेम म्हणजे संसाराच्या शाळेंतील उडाणटप्पू विद्यार्थी, ही कल्पना आतां मागें पडली आहे हें खरें! पण प्रेम जिथें एकदां बसेल तिथेंच त्यानें नेहमीं बसावें अशी आमची अद्यापिहि अपेक्षा आहे. प्रेमाची प्रकृति फार नाजुक असते असें म्हणतात. तें लक्षांत घेऊन त्याला उठाबशांचा व्यायाम सोसणार नाहीं म्हणून ही सूचना केली जाते अशांतला मात्र भाग नाहीं! समाजशास्त्र आणि मानसशास्त्र कांहींहि सांगोत, आमच्या वाङ्मयांतल्या प्रेमाच्या प्रवाहांत कसलेही अनपेक्षित अड-थळे यायचेच नाहींत. भोंवरे, डोह, धबधबा निर्माण करण्याइतके उंच कडे, इत्यादिकांचा या प्रेमप्रवाहांशीं कांहींहि संबंध असतां कामा नये. राष्ट्र व व्यक्ति यांच्याप्रमाणें वाङ्मयही दररोजच्या आयुष्याप्रमाणें बदलत जातें याची जाणीवच आम्हांला नाहीं. नाहीं तर फडक्यांनीं काय हिंदु–मुसल-मानांच्या दंग्यांचीं वर्णनें वाचलीं नाहींत, कीं वरेकरांना परळावर मजूर म्हणून सुखासुखी रहायला जाण्याइतका गिरणीवाल्याचा मुलगा मुक्त कोटीला पोंचलेला नसतो हें ठाऊक नाहीं? 'नवलपूरचा संस्थानिक' लिहिणाऱ्या केळकरांना संस्थानी राजकारणाची माहिती खडान्‌खडा आहे. पण त्यांच्या कादंबरींत मात्र त्या खड्यांचे हिरे झालेले दिसतात. तुरुंगाबाहेर पळून आलेला कैदी जेवढ्या आनंदानें तुरुंगांत परत येईल, तेवढ्याच हौसेनें छळाला कंटाळून घराबाहेर पडलेली तरुणी परत घरांत येईल, ही गोष्ट अत्र्यांच्या ध्यानांत आली नसेल असें नाहीं; पण त्यांना स्वप्नांत आपल्या नाट्यप्रश्नाचें जें उत्तर सांपडलें तें अगदींच निराळें. पहांटे पडलेलीं स्वप्नें खरीं होतात, या गोष्टीवर त्यांनीं वाजवीपेक्षां अधिक भरंवसा ठेवला असावा. वामनरावजींनीं आपल्या भोळ्या नायिकेचें सरला हें नांव जितक्या सहेतुक दृष्टीनें ठेवलें, तितक्याच दूरदर्शीपणानें काळ्या नायिकेचें नांव इंदु ठेविलें यांत संशय नाहीं. पण इंदूचें चित्र काढतांना त्याच्यावरील

डाग जसाच्या तसा दाखविणें जड गेल्यामुळें त्यांनीं त्याला सुंदर हरिणाचें अगर गोजिरवाण्या सशाचें स्वरूप देण्याचा प्रयत्न केला.

## ही भिंत पाडून टाका.

या सर्व उदाहरणांचा मतितार्थ एकच आहे, व तो हाच कीं, आजचें मराठी जीवन व वाङ्मय यांच्यामध्यें भली मोठी भक्कम भिंत उभी आहे. ही भिंत चालविणारा संत क्वचितच् उत्पन्न व्हायचा! सामान्य माणसाला ती चालवून बाजूला करतां येत नाहीं अगर तिच्यावरून उडीही मारतां येत नाहीं. त्याची दृष्टि व्यापक व्हायला हवी असेल तर ती पाडूनच टाकली पाहिजे. कला ही नेहमींच तरुण असते. पण हें अखंड तारुण्य प्राप्त करून घ्यायला जवळून खळबळत जाणाऱ्या जीवनप्रवाहांत तिला पदोपदीं स्नान करावें लागतें. सभोंवतालच्या खऱ्याखुऱ्या जीवनाकडे पाठ फिरवून ती केवळ कल्पनारम्यतेंत अगर भावनाविलासांत मग्न झाली कीं तिच्या लीलांना बाललीलांचें स्वरूप प्राप्त होतें. भातुकली कौतुकास्पद खरी; पण तिनें कुणाचें पोट भरत नाहीं. झालें काय तुला बाई म्हणून आपल्या बाहुलीची समजूत घालणाऱ्या बालिकेचें चित्र अत्यंत आकर्षक असतें यांत संशय नाहीं. पण मोठेपणीं त्या बाहुलीची काय मातब्बरी? जीवनांतील विविध विरोधगर्भ प्रसंगांच्या पायावरच ललितवाङ्मयाचें मंदिर उभें राहतें. हा विरोध तीव्र व भव्य तर असावाच, पण तो सत्यही असला पाहिजे. चैतन्यानें रसरसणारी कला भोंवतालच्या जीवनांतून अचुक असले विरोध हुडकून काढते. उलट निर्जीव कला भूतकालीन रम्य कृतींची सुंदर नक्कल करण्यांत व लोकांच्या करमणुकीकरितां लागणाऱ्या गोड गोष्टी गोळा करण्यांत दंग होऊन जाते. अशा कलावंताच्या अंगीं सौंदर्यदृष्टि, विनोदबुद्धि, लालित्य, रंजकता इत्यादि गुण असतात यांत शंका नाहीं. पण या साऱ्या गुणांचा समुदाय म्हणजे कळस नसलेलें देऊळच! व्यापक सहानुभूति आणि शास्त्रशुद्ध दृष्टीनें मानवी जीवनाकडे पाहण्याची शक्ति यांचा संगम म्हणजेच चिरंजीव कलामंदिराचा कळस!

## पिरँडेलो व कला

या प्रतिपादनावर कलावादी लोकांकडून सहेतुक कला ही कलाच नव्हे असा आक्षेप नेहमीं घेण्यांत येतो. उदाहरणार्थ, त्यांच्या बाजूनें देण्यांत

येणारा अगदीं अलीकडील नामांकित वकील लुइजी पिरँडेलो याचें खालील मत पहावें. तो म्हणतो:—

'In my opinion every author who writes in the interest of or against an existing political system has lost his artistic character. The artist tries to make something Eternal of what is but transitory. The politician tries to extract only a transitory phase from the Eternal. Art with a certain tendency is not genuine art and so I blame every government which desires to use art for propaganda purpose. Art must display its own merits and nothing else. The writer must only write about subjects. He must write about Eternal Man. He must write about himself. An artist who serves politics has signed his own deathwarrant. This is my conviction.'

## कलासृष्टि ही केवळ यक्षभूमि नव्हे !

पिरँडेलोचें हें मत वाचून अनेकांना आनंदाच्या उकळ्या फुटतील. ललितलेखनकलेचा राजकारणाशीं, सामाजिक प्रश्नांशीं अगर राष्ट्राच्या भवितव्यतेशीं कसलाच संबंध नाहीं, असें म्हणणारांना हें मत सुवर्णाक्षरांनीं छापण्याच्या लायकीचें वाटेल. राजनीतीचें वाहन वाघ असो वा उंट असो, सरस्वतीच्या सुंदर मयुराशीं त्याचें दूरचें सुद्धां नातें लागत नाहीं असें म्हणण्याची प्रवृत्ति आपल्याकडे बळावत आहे. ललितवाङ्मय राजकारणाहून श्रेष्ठ असतें हें दाखविण्याकरितां नेपोलियन सेंट हेलिनामधील एकांतवासांत 'गटे' वाचून आनंदाचा उपभोग घेत असे, असा एक दाखला देण्यांत येतो. या उदाहरणावरून गटे नेपोलियनपेक्षां श्रेष्ठ ठरत असेल, तर छापण्याची कला शोधून काढणारा गटेहूनही श्रेष्ठ ठरेल. तो जन्मालाच आला नसता तर गटेचें पुस्तक नेपोलियनच्या हातांत पडलेंच नसतें ! शिवाय या दाखल्याला दुसरीही बाजू आहे. कर्मधर्मसंयोगानें इतिहासांतील कालांत व प्रसंगांत जरूर ते फरक पडून गटेला नेपोलियनपुढें येऊन उभें रहावें लागलें असतें तर ? राजकारण मर्त्य आहे आणि कला अमर आहे, ही गोष्ट खरी. पण कलेचें अमरत्व या मर्त्य गोष्टींतूनच निर्माण होत

असतें. अलीकडच्या तरुणाविषयीं अशी तक्रार मधूनमधून ऐकूं येते कीं, त्यांना ललितवाङ्मयाखेरीज दुसरें कांहींच सुचत नाहीं, रुचत नाहीं आणि पचतही पण नाहीं. प्रचलित राजकारणावरील अग्रलेख वाचण्या-ऐवजीं तेवढ्या वेळांत एक शब्दचित्र अगर भावकथा वाचून होईल, असा ते पोक्त विचार करतात. विज्ञानबोध विकत घेण्याचा प्रश्न आला, तर त्याच्या किंमतींत किती 'सिनेमे' पाहतां येतील याचें त्रैराशिकच ते मांडतील! त्यांच्या ट्रंकेची झडती घेतल्यास त्यांत गांधींचे 'सत्याचे प्रयोग' निघण्याचा संभव फार कमी! कदाचित् प्रेमाच्या प्रयोगाची पूर्वतयारी मात्र त्यांत दिसेल! 'गीता-रहस्य' कुणापाशीं आहे का म्हणून चौकशी केली तर, बहुतेकांचें नकारार्थीच उत्तर येईल! एखादा वात्रट विद्यार्थी मात्र होकारार्थी मान डोलवील. पण त्याची गीता पुस्तकी असण्यापेक्षां हाडामांसाचीच असण्याचा संभव अधिक. हें वर्णन कितपत खरें आहे हें मी सांगूं शकत नाहीं. पण ललितवाङ्मयाचा भोंवतालच्या जीवनाशीं कांहीं संबंध नाहीं, कलासृष्टि ही निव्वळ यक्षभूमि आहे, असें जर कुणास वाटत असेल तर तें चुकीचें आहे. परिस्थितीचा परिणाम मनुष्यावर किती प्रमाणांत होऊं शकतो याबद्दल मतभेद होऊं शकेल. पण, थोड्या प्रमाणांत कां होईना तो होतो ही अनुभवाची गोष्ट आहे. कलावंताचें मन तरी या नियमाला अपवाद कसें होईल? ललितवाङ्मय म्हणजे उदात्ततेच्या पार्श्वभूमीवर काढलेलीं जीवनाच्या अनुभवांचीं चित्रें! 'आमची मर्जी नसेल त्यास आंत घेतलें जाणार नाहीं!' या जुन्या थेटरपीनलकोडाप्रमाणें अमुक अनुभव घ्यायचे व अमुक अनुभव घ्यायचे नाहींत असें ललितलेखकाचें संस्कारक्षम मन ठरवूं शकेल कां? तें मन म्हणजे कांहीं राजवाडा नव्हे कीं तुरुंगही नव्हे! तें देऊळ आहे—अस्पृश्यांनाही जिथें जायला बंदी नाहीं असें तें देऊळ आहे! देशांत कायदेभंगाची एवढी मोठी चळवळ होऊन गेली, तिचा भावनोत्कट ललितलेखकांच्या विचारांवर कांहींच परिणाम झाला नसेल का? नाहीं असें म्हणणें म्हणजे हवामान दर्शविणाऱ्या यंत्रावर वादळाचा आणि थर्मामीटरवर तापाचा कांहींच परिणाम होत नाहीं असें म्हणण्यापैकीं तो प्रकार होईल.

टर्जिनेव्हच्या ‘Fathers and sons’ व ‘Virgin soil’ या दोन कादंबऱ्याही या अनुभवाला पोषक अशाच आहेत. बोल्शेव्हिकच्या मानानें निहिलिस्ट हा शब्द फार जुना. आतां तो फक्त कोशांतच सांपडेल. टर्जिनेव्हनें या कादंबऱ्यांत चित्रित केलेली परिस्थितीहि आतां पार बदलली आहे. पण या कादंबऱ्या आपण परकी असूनसुद्धां अद्यापि गोडीनें वाचूं शकतों. क्षणिकाला चिरंतनाच्या पदरांत पालनाकरितां टाकण्याची त्याची कला खरोखरच अनुकरणीय आहे. अल्पायुषी मार्कंडेय शंकराच्या पिंडीला मिठी मारून ज्याप्रमाणें यमपाशांतून मुक्त झाला, त्याप्रमाणें ललितकृतींतील तात्पुरत्या गोष्टींनाही अमर गोष्टींच्या आश्रयानें जगतां येतें. ‘Fathers and sons’ मधील सामाजिक परिस्थिति बदलली असली तरी तिच्यांतलें जुन्या व नव्या पिढीचें अत्यंत हळुवार कलमानें व कोमल कल्पकतेनें केलेलें चित्रण कधींतरी पुसून जाईल का? Virgin soil वाचतांना तर पुष्कळदां असें वाटतें कीं नेजडेनॉव्ह सिपिॲगिन, कोलोपिटझेव, मार्केलव्ह अशीं कर्णकटु (अर्थात् हिंदी कानांना—रशियन कानांना नव्हेत) नांवें बदलून नारायण, रावसाहेब गोडबोले, प्रभाकर असलीं कांहींतरी नांवें घातलीं तर ही कादंबरी सध्यांच्या आमच्याच जीवनाचें प्रतिबिंब आहे असें वाटेल. रशियांतील अस्थिर राजकीय परिस्थितीचें मंथन करतां करतां टर्जिनेव्हनें स्वभावचित्रणाचीं जीं रत्नें बाहेर काढलीं त्यांचें मूल्य देशकालावर मुळींच अवलंबून नाहीं. कला व वर्तमान परिस्थिति यांचा सुंदर संगम त्याला साधतां आला याचें कारण त्याचें हृदय तळमळत होतें, मन जुळत होते. हद्दपारींत दिवस काढीत असतांना एका कावळ्याला उद्देशून त्यानें काढलेले खालील उद्गारच त्याच्या भावनोत्कट हृदयाची साक्ष देतील.

“Crow, Crow,
You are grizzled, I know,
But from Russia you come;
Ah me! There lies home.”

### व्यक्तिमत्तेचा विकास

या प्रतिपादनाचा अर्थ मराठी लेखकांनीं वृत्तपत्रें मुखोद्गत करायला सुरवात करावी, साष्टांग नमस्कारांची खैरात आरंभावी, अगर आखाड्यांत

कुस्त्यांचे पेंच शिकून मगच सरस्वतीमंदिरांत देवीला सलाम करण्याकरितां यावें असा मुळींच नाहीं. लेखकाची व्यक्तिमत्ता वाढली पाहिजे. पाणी ज्या पदार्थांत मिसळेल त्याचा रंग धारण करतें त्याप्रमाणें कलावंत या नात्यानें त्यानें सर्व अनुभवांशीं समरस व्हावेंच. पण पाण्याचा मूळचा जीवनोपकारक गुणधर्मही त्यानें विसरूं नये. कृत्रिम सौंदर्यापेक्षां स्वाभाविक सौंदर्याचाच परिपोष करण्याचें उच्च ध्येय ललितलेखकापुढें असावें. उदाहरणार्थ एक साधी गोष्ट घेऊं या. मुंबईत एका तरुणाला धूम्रपानाचें व्यसन लागतें. शेजारच्या इराण्याकडून तो नेहमीं धूम्रसाहित्य विकत घेत असतो. हळूहळू त्याचें व्यसन वाढत जातें. तें इतकें कीं, शेवटीं एके दिवशीं तो इराणी त्या तरुणाला सांगतो, 'शेठ, इतक्या सिगारेट ओढूं नका. प्रकृति खराब होऊन जाईल तुमची.' या उद्गारांचें सूत्र हातीं घेऊन कथा लिहायला सांगितली तर अनेक होतकरू लेखक त्या तरुणाच्या चेहऱ्यासारखाच चेहरा असलेला त्या इराण्याचा मुलगा दुर्दैवानें वारला होता, त्या मुलाच्या आठवणीमुळेंच त्याला या तरुणाविषयीं इतका कळवळा वाटला, अशा तऱ्हेची रचना करून गोष्टींत रंग भरण्याचा प्रयत्न करतील. आपल्या देशांतील धर्मभेद आणि जातिभेद यांची तीव्र जाणीव ज्याला झाली आहे असा लेखक दोघांचींही चित्रें सहानुभुतीनें रेखाटून भिन्न धर्मीयांतही सामान्य असा मानवधर्म सुप्तावस्थेंत कसा आढळतो हें दिग्दर्शित करील. सध्यांच्या आर्थिक दुःस्थितीची तीव्रता ज्याला अधिक महत्त्वाची वाटते तो लेखक इराण्याकडे गोष्टींतील तरुण आदरबुद्धीनें पाहत जातो न जातो इतक्यांत एक चौदा पंधरा वर्षांचा मुलगा सिगारेट खरेदी करण्याकरितां येतो व गिऱ्हाइक गमावणें इष्ट नसल्यामुळें तो इराणी त्याच्या धूम्रपानाला योग्य तो मोबदला घेऊन मदत करतो असें दाखवील.

नदी आणि ऋषि यांच्याप्रमाणें ललितलेखनकलेचें मूळ शोधूं नये हें खरें. पण नदीचें मूळ कुठेंही असलें तरी कालवे काढून तिच्या प्रवाहाचा जास्तींत जास्ती उपयोग करणें शक्य असतें. लेखकाची व्यक्तिमत्ता जों जों व्यापक व संस्कारक्षम तों तों तत्त्व व कला यांचा मेळ घालणारी ललितकृति

त्याला साधण्याचा संभव अधिक. दोन वर्षांची लहान मुलगी फणी घेऊन केंस विंचरण्याचा प्रयत्न करीत असतांना तिचे लाडके हावभाव दिसतात, त्याच्यावर या घटकेला असा लेखक कविता करील, तर दुसऱ्या घटकेला भेटायला आलेल्या मनुष्यापाशीं बोलतांना हवापाणी संपून गेल्यामुळें जो मूक चित्रपट सुरू होतो त्याचें विनोदी चित्र तो रेखाटील. रस्त्यानें भिकारी पैसा मागत असतांना सहज खिशांत हात घालावा, हाताला दोन पैसे लागावेत, त्यांतला एक खरा व दुसरा खोटा असावा, खोटा पैसा कांहीं तूं घरीं केलेला नाहींस, तुला कुणी तरी फसवूनच तो तुझ्या गळ्यांत बांधलेला आहे, मग तो भिकाऱ्याला द्यायला काय हरकत आहे, असा वकिली सल्लाहि एका मनानें द्यावा, पण शेवटीं खरा पैसा भिकाऱ्याला देऊन व खोटा खिशांत घालूनच पुढें जावें ! हा एका पैशाचा इतिहास एखाद्या लेखकाच्या हातून ' नीतीचा उगम ' या नांवाचा सुंदर निबंधहि लिहवील. घरांत शिजल्यासारखें होऊन वाऱ्याकरितां अंगणांत बाहेर उभें रहावें, घराच्या बंधनाचा किती त्रास होतो म्हणून उपहासानें घराकडे पहावें, इतक्यांत जोराचा पाऊस येऊन भिजायला होऊं नये म्हणून परत घराचा आश्रय करावा, आणि या घटनेनें ' वारापाऊस ' नांवाच्या सूचक कथेचें बीज द्यावें असें घडणें कांहीं अशक्य नाहीं.

## संकुचित विनोददृष्टि

पण जीवनाशीं, हरघडी पुढें वाहत जाणाऱ्या समाजप्रवाहाशीं आपला निकटचा संबंध आहे हें विसरल्यामुळेंच मराठी ललितवाङ्मय, इतर पुष्कळ वाङ्मयगुण असूनही, पूर्णपणें प्रभावी वाटत नाहीं. विनोददृष्टि ही शंकराच्या तिसऱ्या डोळ्याप्रमाणें असली तरी तो असणारीं माणसें आपल्यामध्यें नाहींत असें नाहीं. मराठी साहित्यांत विनोदाची स्वतंत्र शाखा स्थापन झाल्याला तर तीन तपें झालीं. या काळांत राजकीय, सामाजिक व इतर स्थित्यंतरें इतकीं झपाझप झालीं आहेत कीं त्यामुळें उत्पन्न होणारे विसंवाद आणि मनुष्यस्वभावांतल्या विसंगति विनोदाचा उत्तम परिपोष करूं शकतील. रशियन लेखक कॅटेव्ह यांचें Squaring the Circle हें नाटक या दृष्टीनें अत्यंत वाचनीय आहे. पण अजूनही मराठी बोलपटांतून ढेरपोटीं माणसें

नाचवून आणि त्यांना आपल्या पोटांत लाडू कोंबायला लावून विनोद उत्पन्न केला जात आहे ! नाटकांत पूर्वीच्या खादाड विदूषकाची जागा आचरट कवीनें घेतलेली दिसते. क्वचित् कवि रजेवर गेला तर मास्तर त्याचे बदली काम करितो. दोघेही बिचारे गरीब प्राणी ! त्यांतून लेखणीपेक्षां पलीकडचें हत्यार त्यांना ठाऊक नाहीं ते कसला प्रतिकार करणार ? स्त्रीपुरुषांच्या प्रेमसंबंधाविषयीं अचकटविचकट कोट्या म्हणजे विनोद अशीही समजूत अनेकांच्या लिखाणावरून होते. पण बदलेल्या सामाजिक परिस्थितीमुळें उत्पन्न होणारे विसंवाद व विकृति यांचें हलक्या हातानें चित्रण करण्याकडे अद्यापिहि कुणाचें फारसें लक्ष जात नाहीं. राजकीय घडामोडींत प्रसंगनिष्ठ विनोदाला किती वाव असतो याची कल्पना मी परवांच ऐकलेल्या दोन गोष्टींवरून येईल.

**मेतकूट व मशीनगन !**

तीस वर्षांपूर्वी बॉंबच्या संशयानें पुण्यांत कांहीं झडत्या झाल्या; अर्थात् विद्यार्थ्यांचे गट म्हणजे राजद्रोह्यांचे कट ही समजूत तेव्हांही होतीच. वाल्मिकीच्या आश्रमांतील बटूंना जेवढी घोड्याची कल्पना तेवढीच झडती घेणाऱ्या अधिकाऱ्यांना बॉंबची कल्पना होती. त्यांत कांहीं तरी स्फोटक द्रव्यें असतात ही काय ती मुख्य कल्पना. शिपायांनीं विद्यार्थ्यांच्या खोल्यांच्या झडत्या घेतल्या. त्यांत अभ्यासाचीं पुस्तकें, वह्या, नाटकें, कादंबऱ्या, औषधें, कंगवे, आरसे वगैरे सर्व कांहीं सांपडले. परंतु तो अपेक्षित भयंकर वाटोळा पदार्थ कुठेंच मिळाला नाहीं ! अधिकाऱ्यांनीं तेवढ्यामुळें कांहीं कच खाल्ली नाहीं ! शेवटीं त्यांना एक बाटली मिळाली. तिच्यांत कसली तरी पिवळी पूड भरली होती. तें गंधकयुक्त स्फोटक द्रव्य असलें पाहिजे, अशी त्यांची खात्री झाली. बाटलींतली थोडी पूड घेऊन तिला काडी लावायला एका शिपायाला सांगण्यांत आलें. त्यानें भीत भीत हा शास्त्रीय प्रयोग केला. पण ती पूड कांहीं केल्या पेटेना. पेटणार तरी कशी ? खाणावळींत जेवणाऱ्या त्या विद्यार्थ्यांपैकीं कुणीतरी घरून बाटलींत मेतकूट भरून आणलें होतें.

मेतकुटाचा बॉंब कसा झाला या कथेइतकीच गेल्या कायदेभंगांतील दुसरीही एक गोष्ट गंमतीची आहे. मध्यप्रांतांतील जंगलसत्याग्रहांत पुष्कळ

विद्वान् मंडळी सामील झाली होती. वकील, डॉक्टर, लेखक वगैरे बुद्धि-जीवि वर्गाचे सर्व प्रतिनिधि त्या तुकडींत होते. वाटेंत दूरच्या टेंकडीवर कांहींतरी दिसूं लागलें. तें यंत्र होतें यांत शंकाच नव्हती. सर्वांची खात्री झाली कीं आपणांला भिवविण्याकरितां आणि–( आडवी रेघ फार सूचक असते असें हल्लींचे लघुकथालेखक म्हणतात. तेव्हां यापुढील करुणरस तिनें व्यक्त होईलच ! ) झालें ! हिंदी बहुमतानें ती मशीनगन ठरली. पण शेवटीं ती दुर्बिण होती असें आढळून आलें ! आजच्या आपल्या शास्त्रीय अज्ञानाचा उपरोधगर्भ समाचार घ्यायला अशा गोष्टी उपयोगी नाहींत असें कोण म्हणेल ? कौन्सिलें, कॉंग्रेस, कायदेभंग, इत्यादिकांपासून धर्म, संस्कृति, नवमतवाद, इत्यादिकांपर्यंत सर्व सामाजिक गोष्टींत विनोदाचें शस्त्र ज्यांच्यावर चालविलें पाहिजे असे प्रसंग अनेक आढळतील. बुरखा घेऊन पुरुषानें तोतया स्त्री होणें व त्याची तोतयेगिरी उघडकीला येतांच प्रेक्षकांत हंशा पिकणें या गोष्टी प्रहसनवजा नाटकांत नेहमीं घडून येतात. विनोदाचा उपयोग, ढोंगांनीं तोंडावर घेतलेले विविध संभावितपणाचे बुरखे दूर करून त्याचें सत्य स्वरूप दाखविण्याच्या कामीं; चांगलाच होतो. शिवरामपंत परांजपे व तात्यासाहेब कोल्हटकर यांच्या उपरोधपूर्ण टीकेची परंपरा अखंड चालू राहण्यानें मराठी वाङ्मय तर संपन्न होईलच, पण मराठी जीवनही अधिक विशुद्ध व विचारपूर्ण होईल.

## पावित्र्यविडंबन

इथें एक प्रश्न सहजच उद्भवतो. तो म्हटला म्हणजे पावित्र्यविडंबनाचा ! विनोद हा वाङ्मयांतील दुःशासन असून तो पवित्र भावनेच्या द्रौपदीचें वस्त्रहरण करीत असतो, अशी कळत न कळत अनेकांनीं आपली समजूत करून घेतलेली असते. पण पोलिस शिपाई झडती घेऊं लागल्यावर एखाद्या चोरट्या बाईनें द्रौपदीचा आव आणला म्हणून तो त्यानें खरा मानावा कीं काय ? विनोदाला दुःशासन म्हणण्याआधीं ज्या गोष्टींवर त्यानें हल्ला चढविला असेल तिनें द्रौपदीइतकें मोठेपण आपल्या अंगीं आहे हें सिद्ध केलें पाहिजे. गाय हा उपयुक्त प्राणी आहे, याबद्दल चहा, दूध, तूप वगैरेवर सर्वांस बहिष्कार पडेपर्यंत तरी मतभेद होणार नाहीं. पण

ती देवता आहे असें आजच्या तरुणांना सांगितलें तर ' या देवतेच्या मारक्या शिंगांची व्यवस्था काय ? ' या प्रश्नाचें उत्तर देण्याची तयारी हवी. कोल्हटकरांनीं गणपतीची बेअब्रू केल्याबद्दल त्यांच्यावर खटला चालून ( हा बहुधा दिवाणी कोर्टातला खटला असावा. कारण त्याचा निकाल होईपर्यंत तरुण कोल्हटकर वृद्ध झाले ! ) त्यांना शिक्षा झाली असे शोध नुक्तेच लागूं लागले आहेत. ज्यांनीं गणपतीची शब्दांनींसुद्धां कुचाळी केली नाहीं, उलट लहानपणीं मेळ्यांत काम करून, तरुणपणीं त्याच्या साक्षीनें व्याख्यानें देऊन आणि प्रौढपणीं मुलांकरितां फटाके आणून त्याची सेवा केली अशा पावित्र्यपूजकांना अर्धांगवायु होत नाहीं अगर आजारानें त्यांचें मन दुबळें होत नाहीं असें थोडेंच आहे ? गणपतीवर विनोदी लेख लिहून कोल्हटकरांनीं पावित्र्यविडंबन केलें असें जें लोक म्हणतात, त्यांना हें कळत नाहीं कीं गणपतीची मूर्ति हेंच मुळांत पावित्र्यविडंबन आहे. देवाविषयीं भक्ति उत्पन्न होण्याकरितां जें प्रतीक उत्पन्न करावयाचें त्याचें तोंड कसलें ? तर हत्तीचें ! म्हणजे एखादे वेळीं देवानें भक्ताचे हातांतील प्रसाद ग्रहण करावयाचें मनांत आणलें तर भक्ताच्या अंगाला दरदरून घामच सुटायचा! गणपतीच्या जन्माची कथा काय? तर पार्वतीनें आपल्या अंगच्या मळापासून तो निर्माण केला ! मुलें जर अशीं होत असतीं तर गंडे आणि बोवा यांच्या भजनीं लोक कशाला लागले असते ? एक गोद्रेजची वडी खर्च करतांच मातृपदोत्सुक स्त्री गांधारी व्हायची! गणपतीच्या लहानपणीं 'मी कसा झालों ? ' हें पुस्तक नव्हतें म्हणून बरें ! नाहीं तर त्यानें पार्वतीला नाहीं नाहीं ते प्रश्न विचारून पुरे केलें असतें; आणि ते प्रश्न ऐकून स्मशानापेक्षांहि अधिक एकांतवास मिळेल अशी जागा शोधण्याचा मोह शंकराला झाला असता !

पावित्र्याचीं प्रमाणें पिढीपिढीला बदलत असतात. प्रथम आपले पूर्वज गोमांसभक्षण करीत असत. नंतर शेतीच्या काळांत त्यांनीं गाईला पूज्य मानली. आतां यांत्रिक युगांत एक अत्यंत उपयुक्त प्राणी एवढेंच तिचें महत्त्व राहील. या तिन्ही स्थित्यंतरांत अमुकच पवित्र असें कोण ठरविणार ? सती जाण्याच्या काळांत विधवाविवाहाचें तत्त्व कुणाला पटलें असतें काय ?

उलट शाकुंतलांतील अनेक बायकांचा दादला असलेला दुष्यंत शकुंतलेला प्रेमपाशांत गुंतवतो ही गोष्ट कालिदासाला वाटली नसली, तरी आजच्या काळांत आपल्याला थोडीशी गौणच वाटत नाहीं काय ? ' कांच सामान— संभाळून वापरा. ' अशा चिठ्या मारून रेल्वेनें जशा कांचेच्या वस्तु पाठविल्या जातात, त्याप्रमाणें ' पवित्र, अत्यंत पवित्र ! विनोद करूं नका ! ' अशा पाट्या लावून कां कुठें जुन्या रूढी पिढ्यान् पिढ्या सुरक्षित राहतील ?

## मूर्तिभंजन–प्रत्येक पिढीचा हक्क

मूर्तिभंजन हा शब्द कदाचित् कुणाला कडक वाटेल ! पण सपाटीवरून चालण्याचें भाग्य ज्या पिढीच्या कपाळीं आहे, तीसुद्धां जुन्या मूर्तींचीं ओझीं वाहून न्यायला तयार नसते ! पण ती हळूच खालीं वांकून रस्त्यांत एक एक मूर्ति टाकून देत असल्यामुळें मूर्ति फुटण्याचा आवाज फारसा होत नाहीं. पण ज्या पिढीला डोंगर चढायचे असतात आणि कड्यावरून उड्या मारायच्या असतात तिला जीर्ण कल्पनामूर्तींचीं ओझीं अगदीं असह्य होतात ! तिनें तीं जिवाच्या आकांतानें फेकून दिलीं कीं फुटणाऱ्या मूर्तींचा मोठा आवाज होतो. या आवाजालाच पावित्र्यविडंबन म्हणायचें असेल तर प्रत्येक पिढी तें थोड्या फार प्रमाणांत करीत आलीच आहे.

आजच्या पिढीनें देवता आणि देवळें यांच्याविषयीं रामदासांच्या वेळच्या भावना दाखवाव्या असें म्हणणें म्हणजे रामदासांनीं एलिझाबेथ राणीची गांठ घेऊन इंग्लंडच्या राज्याची सनद कां मिळवली नाहीं हा प्रश्न विचारण्याइतकेंच शहाणपणाचें होईल ! ज्या मनांत एकाच देवाला रहायला जागा मिळेल कीं नाहीं याची वानवा आहे, तिथें मारुतीपासून गणपतीपर्यंतच्या सर्व देवतांचा समावेश व्हावयाचा कसा ? आजच्या पिढीचा देव देवळांत नाहीं. तो माणसांत आहे. त्याचें दर्शन कारखान्यांत होतें, शेतांत होतें, महारवाड्यांतही होतें. स्त्रीच्या रूपानें वावरण्याची त्याला पूर्वीप्रमाणेंच लाज वाटत नाहीं. डोळ्यांतले दुःखाश्रु अगर कपाळावरील घर्मबिंदु याच फुलांनीं अद्यापि त्याची पूजा केली जात आहे हें खरें; पण असा एक काळ येईल कीं, त्यावेळीं आनंदाश्रूंचीं फुलेंच त्याच्यावर उधळलीं

जातील. या नव्या देवाची प्रतिष्ठा करण्याकडे ज्यांचें लक्ष लागलें आहे त्यांना जुन्या मूर्तीचें महत्त्व कसें वाटावें ?

वाङ्मयांतही याच वृत्तीचीं प्रतिबिंबें पडत आहेत. दुःखपर्यवसायी नाटकाच्या शेवटीं 'हे लीलालाघवी जगत्सूत्रधारा' म्हणून ईश्वराला हांक मारून त्याच्या कपाळीं नाटकांतील दुःखाचें खापर फोडण्याचा काळ आतां उरला नाहीं. नाटक हे संसाराचें चित्र असतें हें या दोन्हींतूनही सूत्रधाराची हकालपट्टी झाली आहे, या एकाच गोष्टीवरून सिद्ध होईल. समाजांतल्या सुस्थितीला व दुःस्थितीला युगानुयुगें आकाशाच्या पडद्याआड राहणारा निराधार, निर्गुण ईश्वर जबाबदार नाहीं, समाजच त्याला जबाबदार आहे, ही विचारसरणी दिवसेंदिवस रूढ होत चालली आहे. वाङ्मयांत वेश्यावर्गाचें स्वभावचित्रण कसें बदलत गेलें याचा इतिहास पाहिला तरी हें सहज दिसून येईल. वेश्या म्हणजे जळू. वेश्येच्या मुलींत तिचे सर्व दुर्गुण असायचेच, ही कल्पना तर सर्व प्राचीन वाङ्मयांत आढळतेच ! कल्पनारम्यता व आदर्शनिर्मितीची इच्छा यांच्यामुळें वसंतसेनेसारख्या सोज्ज्वल नायिकाही मधूनमधून चमकल्या आहेत; नाहीं असें नाहीं. पण हे सर्व वाग्विलास रमणीय असले तरी क्यूप्रिननें 'यामा' कादंबरींत रंगवलेल्या वेश्याजीवनाच्या चित्रपटापुढें ते फिक्केच वाटतात. त्यांतील नायिका जेनी ही देवी नाहीं आणि राक्षसीही नाहीं. ती जळू नाहीं आणि गोगलगायही नाहीं. विपरीत आर्थिक व सामाजिक परिस्थितीमुळें उत्पन्न झालेल्या वेश्यावृत्तीच्या गर्तेत पडलेली, तिथल्या घाणेरड्या चिखलांत आकंठ बुडलेली, पण चिखलाच्यावर असलेल्या तोंडांतून आपल्या निर्मळ अंतःकरणाची तळमळ व्यक्त करणारी, उत्कट वात्सल्य असलेली, स्त्रीजातीला भूषणभूत होईल इतक्या सहृदयवृत्तीची मानवमूर्ति आहे! ती वेश्या ही जगाच्या दृष्टीनें चालतीबोलती मांसाची पुतळी ! तिला कसलें अन्तःकरण असायचें ? पण जेनी तिच्याकडे आलेल्या एका सुदृढ, उमद्या व निरोगी तरुणाला 'गरिबीमुळें तुझी बहीण बाजारांत जाऊन बसली तर तुला कसें वाटेल ?' हा प्रश्न जेव्हां करते, अगर 'शेंकडों,

हजारों लोकांनीं मला आपल्या क्षणिक वासनेच्या तृप्तीकरितां जवळ केली आहे, त्यांना रौरवांत लोटून देण्याची शक्ति माझ्या अंगांत असती तर किती बरें झालें असतें! या हजारों लोकांपैकीं एकानें तरी मी मनुष्य आहे हें ओळखायचें होतें!' असे उद्गार जेव्हां काढते आणि आपणाला जडलेल्या रोगाचा प्रसाद सर्वांना देण्याच्या सूडाच्या इच्छेला आळा घालून त्या तरुणाला धाकटा भाऊ करून जेव्हां घरीं परत पाठवून देते तेव्हां तिच्या मानवी अंतरंगांतील विविधता व उदात्तता पाहून आपलें मन आश्चर्यचकित होऊन जातें.

मानवी जीविताकडे पाहण्याचा दृष्टिकोन आतां इतका बदलला असल्या-मुळें पावित्र्य, भावना, देवता वगैरे शब्दांचीं झिजलेलीं नाणीं परत टांक-साळीकडे पाठवलीं पाहिजेत. घरावरलीं कौलें कोसळूं लागलेलीं पाहून तीं नीट करण्याकरतां शिडी आणायला जाणें हाच योग्य मार्ग आहे हें खरें! पण तो केव्हां? वानरांच्या नृत्यकलेनें हा गोंधळ उडविला असेल तर! धरणीकंपाच्या धक्क्याचा तो परिणाम असेल तर? त्या ठिकाणीं बिचारी शिडी काय करणार? यंत्रयुग आणि विज्ञानाची प्रगति यांच्यामुळें जगांतील सर्व समाज पायापासून गदगदा हलूं लागले आहेत. अशा वेळीं आपल्याला आपलें घर कितीही प्रिय असलें तरी तें राहील कीं नाहीं, याची सुद्धां धड शाश्वति नाहीं. मग त्या घरावरील जुन्या कौलांचा मोह धरण्यांत मत-लब काय?

## उज्ज्वल भविष्यकाळ

मराठी भाषा मरणोन्मुख झालेली आहे, असें कुणीच म्हणणार नाहीं. तिची प्रकृति कदाचित् रहावी तितकी बरोबर राहत नसेल. शास्त्रीय वाङ्मयाचा व्यायाम घेण्याचा तिला कंटाळा आहे. प्रेमाची खमंग फोडणी दिलेले पदार्थच तिला फार आवडतात. तिची वेषभूषा अगदीं आजच्या घटकेला शोभणारी असली तरी मन मात्र अजून मागच्या काळांतच रेंगाळत आहे, इत्यादि आक्षेपांत थोडासा तथ्यांश असला तरी तिच्या या तक्रारी कांहीं कायम टिकणाऱ्या नाहींत. ज्यांचें आसन सरस्वतिमंदिरांत स्थिर झालें आहे अशा लोकप्रिय ललितलेखकांनीं

आपल्या आवडीच्या शास्त्राविषयीं वाङ्मय निर्माण करण्याचें ठरविलें तर तें काय त्यांना अशक्य आहे? 'गरज तसा पुरवठा' हें तत्त्व मला वाङ्मयांतहि मान्य आहे. पण तें पाळतांना लेखकानें व्यापारी होऊं नये. डॉक्टर व्हावें. रोग्याच्या शरीराला ज्या ज्या द्रव्यांची जरूरी असते तीं तीं औषधांच्याद्वारें त्याला देणें हेंच डॉक्टराचें कर्तव्य नाहीं का? शिवाय 'गरज तसा पुरवठा' या तत्त्वाइतकेंच 'गरज ही कल्पकतेची आई' हें तत्त्वही प्रसिद्ध आहे. म्हणजे पुरवठा व कल्पकता यांचें बहिणभावंडांचें नातें होतें. हें नातें पाळण्याची दक्षता लेखकांनीं घ्यायला नको का? आपल्याकडे बुद्धिमान लेखकांच्या लिखाणाची स्थिति अनेकदां पहिलवानांच्या शरीरासारखी होते. तारुण्य व महत्त्वाकांक्षा यांच्या बळावर त्यांची चपळ प्रतिभा प्रथम चांगला विजय मिळवूं शकते. पण व्यायामाबरोबरच्च जसें पहिलवानाचें शरीर सुटतें त्याचप्रमाणें वय व कीर्ति यांच्याबरोबर लेखकांचा आळसही वाढतो. आरशासमोर उभे राहून व्यायाम घेत असेपर्यंतच पहिलवानाचें शरीर बांधेसूद राहतें. आपल्याकडे चांगल्या लेखकांच्या लिखाणाचीही तीच स्थिति होते. तो उच्चपदाला चढेपर्यंत त्याच्यापुढें आपल्यांतल्या मोठ्या लेखकांचे आदर्श तरी असतात. पण एकदां तें पद गांठल्यावर मग पुढें काय? निर्वीरमुर्वीतलम्! ह्या निर्वीर पृथ्वीचें क्षेत्रफळ किती मर्यादित आहे आणि लोकसंख्या किती लहान आहे याचें त्याला भानही राहत नाहीं. विद्युद्दीपानें घरांतल्या घरांत रॉकेलच्या दिव्याला खुशाल हंसावें! पण तो खिडकींतून क्षणभर बाहेर पाहील तर लक्षावधि मैलांवरून उज्ज्वल प्रकाशाचें सिंचन करणाऱ्या शुक्राच्या चांदणीकडे पाहून त्याची त्यालाच लाज वाटेल. कलावादी, मत-प्रचारक, वास्तवतेचे भोक्ते, कल्पनारम्यतेचे पुरस्कर्ते, कोणत्याही गोत्राचे मराठी लेखक असोत, इब्सेन, स्ट्रिंडबर्ग, टर्जिनिव्ह, टॉलस्टॉय, हार्डी, शॉ, ब्रिओ, चेकॉव्ह, गॉर्की, अपटन सिंक्लेअर, सिंक्लेअर लुई, यांच्या तोडीचें लिखाण मराठींत व्हावें असें त्यांच्यापैकीं कुणास वाटत नाहीं? पण हें सुखस्वप्न खरें व्हायला जागतिक वाङ्मयाचा जितका खोल अभ्यास हवा तितकेंच कठोर आत्मपरीक्षण करण्याची शक्तीहि हवी. 'Wild Duck' या नाटकांत इब्सेननें आपल्या अतिरेकाला जाणाऱ्या तत्त्वावर स्वतःच कशी टीका

केली आहे हें पहाण्याजोगें आहे. कलावंत असा स्थितप्रज्ञ होऊन मानवी जीवनाकडे पाहूं लागल्यावरच त्याची दृष्टि दिक्कालांचा भेद करूं शकते. पर्वताच्या हृदयांतील आवेगाला वाचा फुटून नदीचा उगम दिसूं लागावा त्याप्रमाणें कलेचा उद्भव आत्मप्रगटनाच्या या धडपडींत होतो. नदी आपल्या भोंवतालचा भूमिभाग प्रफुल्लित करीत वहाते, त्याप्रमाणें रसिकाचें रंजन करीतच कलेचा विकास होतो. पण नदी कुठें ना कुठें तरी समुद्राला मिळावयाची, तशी कला मानवी जीवनाच्या उदात्त ध्येयाशीं एकरूप व्हायची! जीवनग्रंथाचीं वाऱ्यावर उडून गेलेलीं पानें शोधून आणावयाचीं त्या पानांवरील पद्यपंक्ति वाचून त्यांचा अनुक्रम लावावयाचा आणि अशा रीतीनें सामान्य दृष्टीला निरर्थक व नीरस दिसणाऱ्या या विश्वाच्या पसाऱ्यांतील अर्थ व सरसता व्यक्त करावयाची, हेंच तिचें ध्येय! या ध्येयामागें धांवणारे अधिक अधिक लेखक मराठींत उत्पन्न होऊन ते तिचें वैभव व जगाचें बौद्धिक सुख वाढवोत, अशी इच्छा मीं या संमेलनच्या वेळीं प्रकट केली तर तिला आपणां सर्वांचें पाठबळ मिळेल अशी माझी खात्री आहे.

———

साहित्योपासक व साहित्यप्रेमी बंधु-भगिनींनो,

मुंबई-मराठी-साहित्यसंमेलनाच्या दुसऱ्या अधिवेशनाचें अध्यक्षपद मला देऊन आपण सर्वांनीं माझ्यावर जें निरतिशय प्रेम व्यक्त केलें आहे, त्याबद्दल मी आपला अत्यंत ऋणी आहे. मुंबईतल्या एखाद्या चाळी-पेक्षां ज्याची वस्ती जास्त भरणार नाहीं अशा खेडयांत राहणाऱ्या आणि ज्ञान, वय, पदवी वगैरे कोणत्याहि दृष्टीनें वृद्ध नसलेल्या माझ्यासारख्या मनुष्याला हा मान देऊन सरस्वतीमन्दिर व्यवहारांतील सर्व भेदांपासून अलिप्त असतें हें आपण सहज सिद्ध केलें आहे. साहित्यसेवेबद्दल आपण मला दिलेल्या या बक्षिसामुळें आपला अभ्यास अधिक मन लावून कर-ण्याची इच्छा माझ्यासारख्या विद्यार्थ्यांच्या मनांत उत्पन्न झाली आहे, हें मी आनंदानें कबूल करतों.

मुंबई हें हिंदुस्थानचें जसें महाद्वार आहे त्याप्रमाणें तो महाराष्ट्र-शारदा-मन्दिरांतील भव्य दिवाणखानाही आहे. मराठींत प्रकाशित होणाऱ्या पुस्तकांपैकीं निम्मी तरी येथील सुसज्ज प्रसूति-गृहांतूनच बाहेर पडत असतील. इतर व्यापारांप्रमाणें मराठी पुस्तकांचीही हीच महत्त्वाची बाजारपेठ आहे. दैनिकें, मनोरंजक साप्ताहिकें आणि विविध नियत-

कालिकें यांच्या दृष्टीनें मराठींतील केवढ्यातरी प्रकाशनाची जबाबदारी मुंबापुरी संभाळीत असलेली दिसते. विविधज्ञान–विस्तारसारख्या आजोबां-पासून चित्रेसारख्या पाळण्यांतल्या पोरीपर्यंत सर्व प्रकारचें वैचित्र्य या कुटुंबांत आढळतें.

मराठी ग्रंथकारांच्या दृष्टीनें पाहिलें तरी मुंबई संपन्न आहे हें कबूल केलेंच पाहिजे. इथले लेखक लेखक आहेत यांत नवल कसलें? पण डॉक्टर, वकीलच नव्हेत, तर कस्टमसारख्या शारदेशीं बादरायण संबंध नसलेल्या खात्यांतील मंडळीही इथें सरस्वतीची अखंड उपासना करीत असलेली आढळतात. 'माझें रामायण' लिहून वर्तमानकाळाचें चित्र काढणारे तुळजापूरकर अगर प्राचीन काळांतील 'कलंकरहस्या'वर प्रकाश पाडणारे वर्दे उभ्या महाराष्ट्राच्या परिचयाचे आहेत. तरुण 'धांवत्या धोंड्या'चे जनक वरेरकर आणि प्रौढ 'संसार शकटा'चे जनक खाडिलकर यांची सांगड या शहराशिवाय दुसरें कोण घालूं शकलें असतें? कॅप्टन लिमये रोग्याला हंसवून बरें करतात किंवा माधवराव काटदऱ्यांना त्यांच्या कचेरींतून 'हिरवें तळकोंकण' स्पष्ट दिसतें. असें मुंबईच्या वर्णनेंत लिहिलें तर तें अगदींच चूक होईल का? रामदासांपासून टिळकांपर्यंत सर्वांचा सशोधनात्मक दृष्टीनें समाचार घेणारे फाटक, आणि मोर्लेपासून वेल्सपर्यंत सर्व ग्रंथकारांचें सार ग्रहण करणारे वसंतराव नाईक ही विद्वा नांची जोडीहि महाराष्ट्रमान्य आहे. प्रौढ पिढीची ही उज्ज्वल परंपरा चालविणारे बुद्धिमान् तरुण लेखकही भराभर पुढें येत आहेत. 'मोत्यांचीं कुडीं' घालून 'चांदरातीं'त विहार करायला जाणाऱ्या एका तरुणीला 'हृदय' घरीं विसरल्याची आठवण झाली अशी नवलाईची बातमी येथील एखाद्या वर्तमानपत्रानें छापायला मुळींच हरकत नाहीं! मराठी साहित्यिकांचा क्रिकेटसारखा एखादा सामना ठरविला तर एका बाजूचे चांगले अकरा गडी मुंबई सहज उभे करूं शकेल यांत संशय नाहीं.

मुंबईप्रमाणें बाहेरील मराठी साहित्यही शास्त्रीय क्षेत्रांखेरीज इतरत्र विकास पावत आहे. प्राचीन महाराष्ट्र, शब्दकोश, विज्ञानबोध, धर्म-शास्त्रविचार, हिंदूंचें समाजशास्त्र इत्यादि पुस्तकें शास्त्रीय विभागांत दिस-

-तात खरीं! परंतु क्वचित् दिसून येणारी स्वतंत्र बुद्धि व परिश्रम एवढ्याच दृष्टींनीं तीं ठीक आहेत. खरेंखुरें शास्त्रीय वाङ्मय वाढण्यासारखी मराठी जीवनाचीच दुर्दैवानें आज स्थिति नाहीं. मराठीला स्वतंत्र विद्यापीठ नाहीं, अभ्यासी लेखकांना 'क' वर्गाचें अन्न व धर्मशाळेसारखी जागा अविच्छिन्न मिळेल अशी सुद्धां कुठें सोय नाहीं. एखाद्यानें पोटाला चिमटा घेऊन कांहींतरी धडपड केलीच, तर उत्तान प्रणयाला आणि थिल्लर विनोदाला हपापलेला सामान्य वाचकवर्ग तिच्याकडे कशाला लक्ष देईल? उलट आपल्या गुदगुल्यांत व्यत्यय आल्यामुळें तो त्याचें सारें अंग चिमटे घेऊन सुजवूनच टाकील! धन्वंतरीइतका बुद्धिवान् महाराष्ट्रीय डॉक्टर असला तरी संशोधन अगर अनुभवलेखन त्याच्या हातून होणें अशक्य. पाठीमागें संसार व पुढें रोगी याच स्थितींत त्याचा जन्म जायचा! ललित वाङ्मयाची स्थिति मात्र अशी विपन्न नाहीं. नाटकांत अत्रे–वरेरकर; काव्यांत तांबे, यशवंत, माधवज्यूलियन, काणेकर; कादंबरींत जोशी, फडके, माडखोलकर, शिरूरकर; कथेंत गुर्जर, जोशी, सरदेसाई, दौंडकर; विनोदांत चिंतामणराव व बाबुराव, स्त्रीलेखिकांत कुसुमावती देशपांडे, कृष्णाबाई, कमलाबाई टिळक, एवढींच नांवें घेतलीं तरी ललित वाङ्मयगुणांचें वैशिष्ट्यपूर्ण संमेलनच भरविल्यासारखें होईल.

मराठी वाङ्मयाकडे शुद्ध अंकगणिताच्या दृष्टीनें पाहिलें तर त्याची भरभराटच होत आहे असें म्हणावें लागेल. न्यायमूर्ति रानड्यांच्या काळीं लहानसहान चोपडीं जमेला धरूनही प्रतिवर्षी प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांची संख्या फारशी फुगत नसे. पण आजच्या घटकेला मराठींतलें प्रत्येक पुस्तक मी वाचतों असें प्रतिज्ञेवर म्हणणारा भाषाभक्त विरळाच सांपडेल. एकादा मिळालाच तर त्याच्या प्रतिज्ञेचा अर्थ लोणकढी थाप असाच होईल! (एकाद्या अ वर्गाच्या कैद्याला हीं सर्व पुस्तकें अक्षरशः वाचावयाला लावलीं तर त्याला ती शिक्षा वाटण्याचा संभव आहे हा भाग निराळाच! तो कदाचित् क वर्ग मिळावा म्हणून सत्याग्रहही करील!!) परंतु ही भरभराट संख्येची झाली. वाढती लोकसंख्या हें देशाच्या वैभवाचें गमक असतेंच असें नाहीं. बत्तीस मोगरीला फुलांचे कितीतरी मोठमोठे घोंस येतात, म्हणून त्या फुलांचें कुणीं अत्तर केलें आहे का?

विपुल प्रमाणांत प्रकाशित होणाऱ्या या मराठी वाङ्मयाचा बराचसा भाग ललितवाङ्मयानें व्यापला आहे; आणि त्यांत अस्वाभाविक असें काय आहे ? सूपशास्त्रापासून आरोग्यशास्त्रापर्यंतचें सर्व वाङ्मय शास्त्रीय म्हणून त्याच्याकडे आदरानें पाहणारे पंडित अनेकदां ललितवाङ्मयाचा उपहास करतांना आढळतात हें खरें ! त्यांना वाटतें, सर्वांत कठिण असा मध्यान्ह-काळ या वाङ्मयावांचून क्षणभर सुद्धां अडून बसत नाहीं.

मग या वामकुक्षीच्या आणि मुखशुद्धीच्या वाङ्मयाचें इतकें स्तोम माजविण्यांत काय मतलब ? त्यांचें पांडित्य क्षणभरही असा विचार करीत नाहीं कीं ज्या मनुष्यासाठीं हीं सारीं शास्त्रें, त्याचीं सुखदुःखें, त्याच्या आशाआकांक्षा, त्याची प्रगतीची धडपड यांचा यथार्थ बोलपट हें वाङ्मयच दाखवीत नाहीं का ? अर्धवट मिटलेल्या डोळ्यांनीं उताररूची वाट पाहणाऱ्या दरिद्री टांगेवाल्यापासून तों भर दुपारीं तशाच डोळ्यांनीं डॉक्टराची वाट पाहणाऱ्या श्रीमंत रोग्यापर्यंत प्रत्येकाचें मन म्हणजे एक विशाल विश्वच असतें. या जगांत उदात्ततेचीं गगनचुंबी शिखरें आहेत, तशा प्रवाहपतितत्वाच्या नद्याही आहेत. भुकंपाचे धक्के, ज्वालामुखीचे स्फोट, सहारासारखीं वालुकामय मैदानें यांचे अस्तित्व जसें या जगांत आहे, त्याप्रमाणें सुंदर, वनश्री, रमणीय मंदिरें आणि धनधान्यांनीं समृद्ध असे प्रदेशही त्याच्यांत आहेत. अशा कोट्यवधि मनोविश्वांचें सर्वस्पर्शी विश्लेषण ललितलेखका-खेरीज दुसरा कोण करूं शकेल ? ललितवाङ्मय हीं प्रतिभासंपन्न लेखकांना पडणारीं स्वप्नें असतील, पण या स्वप्नांतच मानवजातीचे अनुभव आणि अपेक्षा उत्कटत्वानें उठून दिसत असतात.

शास्त्रीय वाङ्मयाखेरीज समाजाचा तरणोपाय नाहीं असें म्हणणारांची समजूत मनुष्य अन्नावर जगत असला तरी त्याला हवा लागतेच लागते असल्या विधानानें घालतां येईल; पण आजच्या अनेक प्रमुख मराठी ललितलेखकांचा लेखनविषयक दृष्टिकोन पाहिला तर तो आपली वाङ्मयसृष्टि हा सत्यसृष्टीचा सवता सुभा मानण्याकडेच आहे. त्यांचा गुरुमंत्र एकच ! ललितवाङ्मय ही गंधर्वसृष्टि आहे. ( Literature is an escape from life ) जणुं कांहीं ललितकृति म्हणजे एकादी आवाजाशीं

असहकारिता पुकारणारी खोलीच ! बाहेरील जगाच्या आरडाओरड्याचे वा आक्रोशाचे ध्वनि आंत येऊन तेथील रंगाचा भंग व्हायला नको. जें लिहायचें तें गंधर्व–नगरींतील आनंदाचा उपभोग घेण्याकरितां. ललित-लेखनाचा खटाटोप कां करावयाचा ? तर शब्दब्रह्म प्रसन्न होऊन त्यानें कुंभकर्णाला मिळालेल्या निद्रेसारखी शान्ति द्यावी म्हणून !

ललितवाङ्मय ही एक प्रकारची भांग आहे असाच या लोकांचा समज झालेला दिसतो. सत्यसृष्टीचा विसर पडण्याकरितां जगांत एक प्रकारचा उन्माद हवाच हवा असें त्यांचें म्हणणें. हा कैफ महाग व्हिस्कीनें आला तर तें उच्च दर्जाचें वाङ्मय आणि पांच पैशाला पावशेर मिळणाऱ्या माडीनें आला तर तें निकृष्ट वाङ्मय, असा बहुधा त्यांचा हिशेब असावा. पण खरोखरीच ललितवाङ्मय ही संसारतापामुळें प्रतिभेला होणाऱ्या उन्माद-वायूंतील मनोरंजक बडबड आहे का ? 'शाकुंतला'पासून 'सेंट जोन' पर्यंतचीं नाटकें आणि 'डेव्हिड कॉपरफील्ड' पासून 'अँड् क्वाएट फ्लोज् धी डॉन्' पर्यंतच्या कादंबऱ्या या केवळ संसाराच्या दगदगीनें कंटाळून किरकिर कर' णाऱ्या प्रौढांना द्यावयाच्या अफूच्या सुंदर गोळ्याच आहेत काय ? 'प्रतिभा-साधनां'त प्रो. फडके म्हणतात, " गडकरी व सामाजिक सुधारणा किंवा कोल्हटकरांचीं नाटकें व सामाजिक सुधारणा असे विषय घेऊन त्या नाटक-कारांनीं सामाजिक सुधारणेचें कार्य केलें असें प्रतिपादन करण्याचा कोणी उपक्रम केला कीं मला हंसूं येतें. " कोल्हटकर–गडकऱ्यांनीं आपल्या नाटकां-तून जितक्या स्पष्टपणें विचारप्रदर्शन करायला हवें होतें तितकें तें केलें नाहीं म्हणून हा उपक्रम त्यांना हास्यास्पद वाटतो असें मात्र नाहीं. व्यव-हारी अपूर्णांक व हिंदी संगीत, माशांचें खत आणि नृत्यकला, हे विषय व्याख्यानाला घेण्यासारखें कांहीं तरी हास्यास्पद या विषयांत आहे, अशी त्यांची समजूत आहे. शॉ, गॅल्सवर्दी, इब्सेन वगैरे नाटककारांचा समाज-सुधारणेशीं जो हरघडीं संबंध जोडला जातो तो पाहून त्यांचें हें हास्य अधिक स्फुट अगर अस्फुट होतें, हें कळण्याला प्रतिभा–साधनांत फारसा पुरावा नाहीं.

साहित्याच्या कलांगावर प्रभुत्व असलेल्या प्रतिभासंपन्न लेखकांना कलेचें विचाराशीं लागणारें लग्न इतकें नापसत कां व्हावें ? कदाचित् असें असेल,

त्यांच्या मतें कला ही मूळची गगन–विहारी अप्सरा ! तिनें तत्त्वासारख्या मृत्युलोकांतल्या एखाद्या मनुष्याशीं जन्माची गांठ बांधून घेणें म्हणजे मूर्ख-पणाच ! उर्वशी शेवटीं पुरुरव्याच्या हातावर तुरी देऊनच गेली नाहीं का ? विद्युल्लतेचें खरें नृत्य जसें आकाशांतच पहावें त्याप्रमाणें कलेचा स्वच्छंद विलासही अनिर्बंध स्थितींतच अत्यंत आकर्षक होतो. अशा वेळीं केशवसुतांनीं आपल्या एका प्राथमिक कवितेंत काढलेले उद्गारही त्यांच्या बाजूनें साक्षीदार म्हणून पुढें येतात––

"अशी असावी कविता, फिरून
तशी नसावी कविता, म्हणून
सांगावया कोण तुम्ही कवीला
आम्हांला मोठे ? पुसतो तुम्हांला
लाडीगुडी चालव लाडकीशीं
अशा तऱ्हेनें, जरि हें युव्याशीं
कोणी नसे सांगत, थोर गौरवें
कां तें तुम्हीं सांगतसां कवीसवें ?

* * *

कवीस सोडा कवितेबरोबरी
न जाच वाटेस तयाचिया तरी
तयाचिया हो खिडकीचिया, उगे,
खालीं तुम्ही जाउनि ही रहा उभे.
तिच्या तयाच्या मग गोड लीला
ऐकूनि, पावाल तुम्ही मुदाला ?"

सारांश, रसिक समाजाचा जास्तींत जास्ती हक्क काय तो ललितलेखक कल्पनाकामिनीबरोबर क्रीडा करीत असतांना त्याच्या खिडकीखालीं उभें राहण्याचा ! तिथून बिचाऱ्याला दिसणार तरी काय आणि स्पष्ट असें ऐकूं तरी काय येणार? कारण बोलून चालून तो प्रणयसंवाद असायचा ! तशांतून या दंपतीनें खिडकींतून कांहीं निर्माल्य खालीं टाकले तर बिचाऱ्या रसिकाची जातां जातां पूजा व्हायची ! अशा वेळीं चूळ भरण्याची या

जोडण्याला लहर आली तर मग विचारायलाच नको. घरीं जाऊन सचैल स्नान करण्याचें बक्षीस या रसिकतेला हटकून मिळायचें ! अमुक विषय कवितेला योग्य नाहीं, तमुक तऱ्हेनें नाट्यरचना करूं नये वगैरे परंपरागत कृत्रिम बंधनांविरुद्ध बंड करण्याकरितांच केशवसुतांनीं ही कविता लिहिली असावी असें दिसतें. कारण त्यांच्या वैचित्र्ययुक्त कवितांतून सामाजिक सुखदुःखांचे सूरहि चांगलेच ऐकूं येतात.

‘ प्राप्तकाल हा विशाल भूधर
सुंदर लेणीं तयांत खोदा,
निजनामें त्या वरतीं नोंदा. ’

‘ पूर्वींपासुन अजून सुरासुर
तुंबळ संग्रामाला करिती;
संप्रति दानव फार माजती,
देवांवर झेंडा मिरविती
देवांच्या मदतीस चला तर. ’

“ वैर तयांला, थप्पड बसतां चोळिति जे गालांस
वैर तयांला, जे गरिबी शिकवितात बालांस ”
“ देवदानवां नरें निर्मिलें हें मज लोकां कळवूं द्या. ”

केशवसुतांसारख्या कल्पक कवीच्या काव्यांतही नकळत सामाजिक जीवनाचे पडसाद कसे उठतात हें यावरून दिसून येईल. पण वादाचा मुख्य मुद्दा इथेंच आहे. या कवितांत काव्य आहे हेंच कित्येक कबूल करणार नाहींत, तर कित्येक कालिदासाच्या मेघदूताइतकें हें काव्य टिकेल कीं काय म्हणून प्रश्न विचारतील. केशवसुतांनीं कालिदासामागून जवळ जवळ दीडदोन हजार वर्षांनीं जन्म घेतला असल्यामुळें दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर निदान पसतिसावें शतक उजाडल्याशिवाय देणें रास्त होणार नाहीं. पण केशवसुतांचें काव्य कालिदासाइतकें टिकलें नाहीं तर त्यांची प्रतिभा दुय्यम दर्जाची होती एवढेंच त्यावरून सिद्ध होईल. त्यांनीं आपल्याभोंवतालच्या जीवनाचीं प्रतिबिंबें चित्रित करण्यांत चूक केली, हा निष्कर्ष

त्याच्यांतून कसा निघणार ? कालांतरानें चित्र पुसट झालें तर तो रंगाचा आणि चित्रकाराच्या कलमाचा दोष; चित्रविषयाचा खास नव्हे.

कलादृष्टि हीच साहित्याची एकमेव कसोटी मानणारांचा युक्तिवाद अनेकदां मोठा गंमतीचा असतो. ब्रह्मास्त्र म्हणून ते एक प्रश्न नेहमीं प्रतिपक्षाच्या अंगावर फेकतात. "शाकुंतलांत गरिबांचीं दुःखें चित्रित केलीं नाहींत आणि मेघदूतांत बहुजनसमाजाचें गाऱ्हाणें गायिलेलें नाहीं. परंतु त्यांतील कलाविलास अमर नाहीं का ?" शाकुंतल व मेघदूत वाचतांना विसाव्या शतकांतील मनुष्यालाही आनंद होतो, हें कुणीहि मान्य करील. त्या आनंदाचा संबंध खादीपासून साम्यवादापर्यंत कोणत्याही प्रचलित लहानमोठ्या समाजप्रश्नाशीं खास नाहीं. गर्भवती शकुंतलेशीं आपल प्रेमसंबंध होता हें नाकारून दुष्यंतानें कानांवर हात ठेवतांच तिला स्वर्गांत घेऊन जाणारी मेनका कालिदासाला शक्य कोटींतली तरी वाटली असेल. पण १९३५ च्या असल्या शकुंतलेला आपलें तोंड लपवायला आईचा मायेचा पदर तरी मिळेल कीं काय याची शंकाच आहे. शेवटीं एकादा अनाथ–महिलाश्रम हाच तिचा स्वर्ग व्हावयाचा. तथापि शाकुंतल आपण अद्यापिही आवडीनें वाचतां. मेघदूतांतल्या विरही यक्षाचे काव्य-मय निःश्वास ऐकतांना आजच्या घटकेलाही आनंद होत नाहीं असा कोण आहे ? या आनंदाचा उगम मूलभूत मानवी मनोविकारांतच आहे, याबद्दल तरी कुणाची तक्रार आहे ? जीवनवादी ललित वाङ्मयांत मानवी प्रेरणावर व मनोधर्मावर बहिष्कार टाकावा असें म्हणतो तरी कोण ? जगांतल्या कुठल्याही वाङ्मयांतील मातृहृदयाचें चित्रण घ्या. त्याची बरो-बरी करण्याचें सामर्थ्य गोर्कीच्या Mother या कादंबरींत आहे. असें असून ती कादंबरी लेखकानें आपल्या भोंवतालच्या जळत्या जीवनाचे स्फुल्लिंग घेऊनच निर्माण केली नाहीं का ? आमच्याकडील कलेच्या नाजुक प्रकृतीला न मानवणारे मतप्रचार–तत्त्वप्रदिपादनाचे लवंगावेलदोडे या कादंबरींत भरपूर आढळतील. असें असून केवळ कलांगांत तरी तिची बरोबरी करणाऱ्या कादंबऱ्या आपल्याकडे कितीशा सांपडतील ?

खरें बोलायचें तर आमचे कलावंत या बाबतींत आत्मवंचना करून घेत आहेत. तत्त्वप्रतिपादनाचा प्रश्न आला कीं कॉलेजांतल्या तरुण–तरु-

णींतून आणि आपल्या सुखवस्तु चार भिंतींतून जे ते उठतात ते तडक कण्वाश्रमातील शकुंतलेच्या पाठीमागें जाऊन दडतात. 'शाकुंतला'ची या विशिष्ट दृष्टीनें चर्चा केली तर ती कांहीं अंशीं त्यांच्या विरुद्धच जाण्याचा संभव आहे. कालिदासाच्या तिन्ही नाटकांत विवाहित राजांच्या नव्या प्रणयाच्या कथा आहेत. असें होण्याचें कारण त्यावेळच्या समाजपरिस्थितींतच नसेल का? दुर्वासाच्या शापानें दुष्यंताची स्मृति नाहींशी झाली ही क्लृप्ति कविकुलगुरूनें लढविण्याचें कारण नाट्यपीनलकोडाप्रमाणें नायकाचा धीरोदात्तपणा कायम ठेवणें हें होतें, कीं राजाश्रयाचें ऋण प्रेक्षकांच्या साक्षीनें फेडण्याचा डाव त्यांत होता? हे सारे प्रश्न बाजूला ठेवले तरी एक सहज दिसणारी गोष्ट शिल्लक राहतेच. कोहिनूर राजमुगुटांत शोभतो. पण चमक्यांत चमकण्यापलीकडे ज्यांचा उपयोग नाहीं अशा क्षुद्र हिरकण्यांनीं तोच हट्ट धरणें वेडेपणाचें नाहीं का होणार? आजच्या उठल्या सुटल्या लेखकाला जर कालिदासाइतकी प्रतिभा प्रसन्न होऊं लागली तर शाकुंतल व मेघदूत वाचण्याचे श्रम पुढील पिढी घेईल तरी का? कालिदासाप्रमाणें शेंकडो प्राचीन कवींनीं कलाप्रधान लेखन केलें असेल. पण त्याचा मागमूससुद्धां उरलेला नाहीं. शिवाय भवभूतिच्या उत्तररामांतील सीतात्यागाचा प्रसंग जेवढा हृदयस्पर्शी तेवढाच गॅल्सवर्दीच्या 'स्ट्राइफ्' नाटकांतील रॉबर्ट्‌सच्या बायकोच्या मृत्यूचाहि नाहीं का? घरीं बायको मरणाच्या दारीं पडली असतांना कर्तव्य म्हणून रॉबर्ट कामगारांच्या सभेला जातो. आतां हा सुंदर प्रसंग एका हेतुप्रधान नाटकांत आला असल्यामुळें त्याची किंमत कमी होत असेल तर ती गोष्ट निराळी!

खरी काव्यदृष्टि क्ष किरणांहूनही भेदक असते. सौंदर्याचीं सर्व स्वरूपें तिला क्षणार्धांत आत्मसात् करतां येतात यांत नवल नाहीं. पण कुरूपतेचें शल्यही त्यामुळें अत्यंत तीव्रतेनें तिला टोंचत बोंचत राहतें. जगांतील ही कुरूपता नाहींशी व्हावी म्हणून जी तिची धडपड चालते तिलाच ध्येयसृष्टि म्हणायचें. ही धडपड वास्तवाशिवाय दुसऱ्या कशाच्या आधारावर चालणार? स्वतःच्या दुःखांइतकीं इतरांचीं दुःखें चटके देऊं लागलीं, साऱ्या मानव जातीविषयीं एखाद्या व्यक्तीप्रमाणें जिव्हाळा उत्पन्न झाला, मानवधर्माचे खोल दडून बसलेले बोल ऐकूं येऊं लागले म्हणजे तिचा खरा

विकास प्रत्ययाला येतो. काव्याचें—ललित वाङ्मयाचें—जग व्यवहारी जगाहून निराळें खरें; पण तें याच जगांतून निर्माण व्हावयाचें असतें; वास्तव-जीवनाचें सोनें, विचाराचा प्रज्वलित अग्नि आणि कलाकुशल सुवर्णकाराची निर्माणशक्ति यांच्या त्रिवेणी संगमावांचून शारदेच्या भांडारांत मोलाची भर घालणारा अलंकार तयार होणेंच शक्य नसतें.

आमचे आजचे कलावंत यांतील पहिल्या अंगाकडे थोडेसें लक्ष पुरवितात व तिसरें अंग म्हणजेच साहित्याचें सर्वस्व असें मानतात. कॉलेजांतल्या कितीहि तरुणांचीं चित्रें त्यांनीं काढलीं तरी त्यांत स्वप्नरंजित प्रणयाच्या छटांखेरीज दुसरा रंगच आढळणार नाहीं! पण खऱ्याखुऱ्या कॉलेजच्या विद्यार्थ्यांशीं कुणाचीही गांठ पडो. चार मुलांपैकीं एकादा तरी ‘ शिकून तरी पुढं काय करायचं बुवा ?’ असा मनांत खळबळ उडविणारा प्रश्न केल्याशिवाय राहत नाहीं; आणि ज्याच्यावर प्रेम बसलें त्याच्याशींच लग्न होण्याचें भाग्य असणाऱ्या कादंबऱ्यांतील सुंदर तरुणी! सत्यसृष्टींत त्यांचे नमुने शोधून काढण्यापेक्षां एव्हरेस्टचा शोध लावणें बरें, असेंच कुणालाही वाटायचें !

हें झालें जीवनाचें निरीक्षण. कलेला विचार करायला लावणें म्हणजे गजगति रमणीवर सत्तावीस मैल धांवण्याच्या शर्यतींत भाग घेण्याची सक्ति करण्यांतलाच प्रकार होय असें अशा लेखकांचें मत असायचें! राहतां राहिला तिसरा, रचना—कौशल्याचा भाग. नायक—नायिकांची भेट नव्या रीतीनें कशी घडवायची ? तीं शेजारीं राहत होतीं, कॉलेजमध्यें एका वर्गांत जात होतीं, या अगर—असल्या नित्याच्या गोष्टींत कला कुठें आहे ? अर्थात् दोघांपैकीं कुणाला तरी अपघात घडलाच पाहिजे. मोटार, टांगा, सायकल वगैरे सर्व लहान मोठे गोड अपघात मराठी वाङ्मयांत होऊन चुकले आहेत. तेव्हां लवकरच विमानाचा अपघातही साहित्यांत होईल असा रंग दिसतो. नायिका डॉक्टरीण दाखवून तिच्या बंगल्याच्या कंपाउंडांतच नायकाचें विमान कोसळलें तर हा आरंभ नावीन्यपूर्ण व्हायला काय हरकत आहे ?

याचा अर्थ उत्कंठावर्धक मांडणीकडे लेखकानें दुर्लक्ष करावें असा मुळींच नाहीं. पण स्त्रीची वेषभूषा हें जसें तिचें रूप नव्हे त्याचप्रमाणें

या अभ्याससाध्य व कांहीं अंशीं यांत्रिक गोष्टी म्हणजे कल्पकता नव्हे. प्रतिभेच्या विहिरीला तंत्राचे पंप लावून शारदेच्या बागेंत जिकडे तिकडे फुलेंच फुलविण्याची कल्पना थोडी हास्यास्पद नाहीं का ?

अशा विचित्र कल्पना प्रचलित होण्याचीं कारणें अनेक आहेत. 'काव्यं यशसेऽर्थकृते' हें मम्मटापासून चित्र-शाळेच्या वासुकाका जोशांपर्यंत सर्वांना थोडें फार मान्य आहेच. ( श्री. जोशी यांच्या मासिकांकडून कवितेला मोबदला मिळणार नाहीं, असा इषारा लेखकांना दिला जात असे. अर्थात् कवीचें नांव कवितेवर छापून त्याला कीर्ति देण्याला मात्र त्यांची ना नाहीं ! ) कीर्ति व पैसा हीं ग्रंथलेखनाला प्रेरक व्हावींत हें आजच्या समाजस्थितीला धरूनच आहे. दुर्गम गिरिशिखरावर वास करणारी यशोदेवता व सागर-कन्या लक्ष्मी या एकमेकींच्या जवळ राहात नसल्या तरी त्यांचें तरुण मनाला सारखेंच आकर्षण वाटतें यांत संशय नाहीं. या दोघींत कीर्तीच्या मागें लागणाराची अनेकदां फसवणूक होत असेल; पण ती इतरांकडून ! कीर्ति ही सुसंस्कृत वाचक वर्गाच्या पसंतीची मुद्रा असल्यामुळें तिच्या मागें लागणाराला मधून मधून डोळे उघडून तरी पहावें लागतें; पण एक लघु-कथा म्हणजे एक सुंदर सूट अगर एक नाटक म्हणजे एक मोटार अशा तोंडच्या हिशेबाच्या तालावर लेखनकला नाचूं लागली म्हणजे बाजारी पसंतीपेक्षां तिला अलीकडचें कांहींच दिसत नाहीं. सरस्वती लक्ष्मीची दासी झाली कीं तिच्या सुंदर वाहनाला चिखलांत समाधि मिळालीच म्हणून समजावें. या चंचल लक्ष्मीबरोबर नाचतांनाच सरस्वतीची पुरेवाट व्हावयाची ! मग मधुर वीणावादनाला अनुकूल असें मनःस्वास्थ्य तिनें बिचारीनें कुठून मिळवावें ?

स्त्रीचें कार्यक्षेत्र चूल आणि मूल असें म्हणणारांची दृष्टि आपणांला संकुचित वाटते. कलावंत साहित्यिकांचें कार्यक्षेत्र सौंदर्य व आनंद, असें म्हणणारेहि त्या दृष्टीनें सनातनी साहित्यिकच नाहींत का ? कलावंत लेखक हें या फुलावरून त्या फुलावर जाणारें व मिळेल त्या मधाचा चट्टामट्टा करणारें फुलपांखरूं नाहीं; ती मधमाशी आहे. ती मध गोळा करते; पण तो स्वतःकरितां नाहीं. आपल्या मधुसंचयाच्या आड येणाऱ्याला चांगला

दंश करण्याची शक्तिहि तिला असते. सौंदर्याचें स्तोम माजविणारांनीं जगांतील कुरूपतेकडे पाहिलेंच पाहिजे.

आनंद निर्माण करण्याचा हव्यास बाळगणारांनीं भोंवतालच्या दुःखा-कडे डोळेझांक करून कधींच चालणार नाहीं. कलावंत साहित्यिकानें विचारवंत झालें पाहिजे असाच आजचा काळ आहे.

इंग्लंडमधील बेनेट, वेल्स, गॅल्सवर्दी व शॉ हे चार लेखक घेतले तर त्यांची तुलनासुद्धां हेंच दर्शवीत नाहीं का? या सर्वांत बेनेट खराखुरा धंदेवाईक लेखक. ग्रन्थलेखनाच्या मंत्रतंत्राची उठाठेव त्याच्याइतकी कुणीच केली नाहीं. शारदेला प्रसन्न करण्याकरितां गंडे, ताईत, दोरे यांच्या शोधांत होतकरू लेखक नेहमीं असतातच. त्यांना मागणीप्रमाणें या साहित्याचा पुरवठा बेनेटनें भरपूर केला. 'Mile Stones' सारखें नाटक किंवा 'Five Towns' विषयींच्या त्याच्या कथा त्याची निरीक्षणशक्ति व कलागुण निःसंशय दर्शवितात. पण लिहिण्याच्या टेबलावर जमाखर्चाची चोपडी घेऊन बसायची संवय झाल्यामुळेंच कीं काय त्याचें बरेंचसें लिहिणें बाजारी झालें. त्याच्या मृत्यूला किती थोडे पावसाळे लोटले? पण इतक्यांत त्याचें नांव धुवून नाहीसें झालें असेंच वाटूं लागलें आहे.

वेल्स, गॅल्सवर्दी आणि शॉ हे तिघेहि बेनेटच्या मानानें ध्येयवादी. वेल्समध्यें पढिकाचें पांडित्य, गॅल्सवर्दीमध्यें न्यायाधिशाची समतोल वृत्ति व शॉमध्यें कुशल शस्त्रवैद्याची बुद्धि प्रतीत होते. या तिघां लेखकांची वाङ्मयगुणांच्या दृष्टीनें कदाचित् तुलनाहि होणार नाहीं. पण आजच्या समाजाच्या घडामोडी जिव्हाळयानें पाहून आणि विचारानें पारखून त्यांतील मानवी अंतरंगावरच थोड्याफार प्रमाणांत त्यांनीं आपली साहित्यसृष्टि उभारली आहे. या सर्वांत शॉ पट्टीचा वादकुशल असल्यामुळें त्याच्या नाटकांत कला नाहीं, असा आक्रोश करण्याचा प्रघात पडला आहे. लेखन हा खाणावळीप्रमाणें टापटिपीनें व गिऱ्हाइकाला खूष करील अशा रीतीनें करण्याचा धंदा आहे असें मानणाऱ्या एकाद्या क्रेटन हॅमिल्टननें खुशाल तसें म्हणावें. पण इंग्रजी नाट्यकारांत शेक्स्पीअरच्या नांवानें अनामिका पडली तरी तिच्या जवळचें बोट शॉकडेच दाखविलें पाहिजे असें अजूनहि जगां-तील रसिक पंडितांचें मत आहे.

प्रचलित समाजाचें सर्वस्पर्शी व सत्य चित्रण वाङ्मयसौंदर्याला मारक न होतां प्रेरकच होतें, याचें झगझगीत उदाहरण रशियांतील लेखक-चतुष्टयाचें आहे. हे चौघे लेखक टर्जीनेव्ह, डोस्टोव्हस्की, टॉलस्टॉय व गोर्की हे होत. बेनेटसारख्या धंद्याची दृष्टि असणाऱ्या लेखकानें टर्जीनेव्हचा जगांतला एकच एक पूर्णतेला पोंचलेला कलावंत कादंबरीकार म्हणून गौरव केलेला आहे. पण त्याच्या सुप्रसिद्ध 'Fathers and Sons, 'Virgin Soil' इत्यादि कादंबऱ्यांत काय आढळतें ? काव्यमय चौकटींत बसविलेलीं पौराणिक व ऐतिहासिक शिळीं स्वभावचित्रें, अद्भुतरम्य प्रणय-कथा, कीं आरामखुर्चीवर सुखासीनपणानें पडून पाहिलेलीं सुखस्वप्नें ? मुळींच नाहीं. 'Fathers and Sons' मधील नायक बॅझेरॉव्ह हा टर्जीनेव्हच्या वेळच्या निहिलिस्ट तरुणांचा प्रतिनिधिच आहे म्हटलें तरी चालेल. समाजाकरितां तळमळणाऱ्या, जुन्यांत श्रद्धा व शक्ति घेण्यासारखें कांहींच न उरल्यामुळें नव्याकडे उत्कंठेनें पाहणाऱ्या रशियन तरुणांच्या आकांक्षांचें हें चित्र केव्हांही व कुठेंही रमणीयच वाटेल. Virgin Soil मधील नायक नेज्डेनॉव्ह हा नुसता काव्यात्मा आहे. समाजाच्या पुनरुज्जीवनाला लागणारें कणखर कर्तृत्व त्याच्या कोंवळ्या काव्यात्मतेंत नसल्यामुळें त्याचा कसा कोंडमारा होतो याचें हृदयंगम करुणचित्र या कादंबरींत पहावयाला मिळतें. रशियाच्या तत्कालीन राजकीय व सामाजिक परिस्थितीचा वैचित्र्यपूर्ण चित्रपट यथातथ्य रंगवूनही टर्जीनेव्हची काव्यकला या कादंबरींत कृष्णपक्षाकडे कलली आहे असें कुणालाच म्हणतां येणार नाहीं.

डोस्टोव्हेस्की फांसावर लटकून त्याच्या प्रभावशाली प्रतिभेला जग मुकायचें अशीच परिस्थिति त्याच्या तरुणपणीं आली होती. पण सुदैवानें प्राणावरचें संकट मुदतीच्या हद्दपारीवर निभावलें. त्याच्या कादंबऱ्यांतून मूर्तिमंत वास्तवता विहार करते. मात्र तिला भिऊन कला आणि कल्पना कुठें पळून गेल्या नाहींत अगर दडूनहि बसल्या नाहींत. 'Crime and Punishment' ही त्याची एकच कादंबरी वाचली कीं जीवनांतून स्फुरलेलें वाङ्मय आणि कृत्रिम कलेनें निर्माण केलेलें वाङ्मय यांच्यांतील फरक चटकन् दिसून येतो. नायक खुनी आणि नायिका शरीरविक्रय करणारी ! पण त्यांच्या अंतरंगाचें दर्शन किती हळुवारपणानें कादंबरीकारानें करविलें

आहे ! आमच्या कादंबऱ्यांत नायक सहसा खून करणारच नाहीं. फार तर कादंबरीकाराच्या कृपेनेंच झालेला खून शोधून काढून तो या शोधाचें बक्षीस म्हणून सुंदर बायको मात्र पटकावील ! आमच्या कथांतून वेश्या आली तरी तिचें सहानुभूतियुक्त चित्रण सहसा आढळायचें नाहीं ! जास्तींत जास्त म्हणजे एकादा नायक वेश्येच्या सुंदर मुलीशीं लग्न करील. पण तिच्या आईचें जीवन ? त्याला काय त्याचें ?

टॉलस्टॉयचें लेखन पुढें पुढें स्वप्नाळु तत्त्वज्ञानाकडे झुकलें असलें, तरी रशियन समाजांतील सर्व सोगेंढोंगें त्यानें अंतःकरणाच्या तळमळीनें चित्रित केलीं आहेत. वैचित्र्यपूर्ण रशियन जीवन, राज्यव्यवस्था आणि समाज-व्यवस्था यांच्याकडून न्याय व समता यांचीं होणारीं विलक्षण विडंबनें, संपत्ति व संस्कृति यांचे गगनचुंबी मनोरे उभारण्याकरितां त्यांच्या पायांत अगदीं पाताळापर्यंत गाडले गेलेले गरीब शेतकरी या सर्वांचीं निरुपम चित्रें त्यानें रेखाटलीं आहेत. ढोंग, बुरखा, आडपडदा या शब्दांची किळस येण्याइतकें प्रभावी त्याचें लेखन आहे. तत्त्वप्रतिपादनानें परिपूर्ण असूनही त्याच्या लेखनांत कलेचा कोंडमारा कुठें झाला आहे ?

गोर्कीचें उदाहरण म्हणजे या जीवनप्रधान कलामंदिरावरील कळसच. Twenty-six men and a girl हें त्याच्या एका गोष्टीचें नांव ऐकून सुद्धां त्याचा निषेध करण्याकरितां आपल्याकडील एखादें सनातनी मासिक खास अंक काढण्याच्या तयारीला लागेल. त्याच्या दुसऱ्या एका गोष्टींत प्रवासांत रस्त्यावर प्रसूत व्हाव्या लागणाऱ्या एका गरीब स्त्रीचें हृदयभेदक चित्र आहे. अशीं दुर्दैवें आपल्याकडे देखील अगणित आहेत. परंतु कंपित हृदयानें पण निश्चल डोळयांनीं तीं पाहून चित्रित करणारा गोर्की आपल्यांत कुठें आहे ? हें त्याचें नाटक कैफ आणणाऱ्या कृत्रिम कलेचे सर्व नियम धुडकावून लावतें. समाजाच्या तळाचा सर्व गाळ—स्वतःची तहान भाग-विण्याकरितां सत्ताधारी श्रीमंतांनीं पाणी वस्त्रगाळ करून घेतल्यामुळें सांचत गेलेला गाळ—The Lower Depths या नाटकांत त्यानें किती सहृदयतेनें दाखविला आहे ! ' आपण जिवंत कां आहोंत हें कोडें ज्यांना सुटत नाहीं असे शेंकडों लोक या जगांत आहेत, ' ' पायांत घालायला

बूट नसले तर तिथें कांहीं अब्रूचा नी इभ्रतीचा उपयोग होत नाहीं,' 'भुकेलेल्या कुत्र्याचा फक्त मांसाच्या तुकड्यावरच विश्वास बसतो' इत्यादि या नाटकांतलीं वाक्यें सुंदर स्त्रीच्या वर्णनापेक्षांहि मनाची अधिक पकड घेत नाहींत का? गोर्कीला नोबेल प्राइझ न देण्यांत मोठा अन्याय झाला आहे असें जगांतील प्रमुख रसिकांचें मत आहे. समाजवादी विचारसरणीच्या जोडीला नवें विश्व निर्माण करण्याची कला असल्याशिवाय का हा करभार त्याला मिळाला असेल?

प्राचीन मराठी कवींनीं कलेप्रमाणें विचारप्रवर्तनाच्या कामींही आपल्या लेखनशक्तीचा उपयोग केला आहे. पण लंगोटी लावून फिरणारा रामदास आणि व्यापारांत बुडणारा तुकाराम यांचे दाखले आमचे आधुनिक भोगवादी कलावंत मानायलाहि तयार होणार नाहींत! चिपळुणकरांनीं भाषाभिमानानें मराठी गद्याचा पाया घातला तेव्हां तो पक्का व्हावा म्हणूनच कीं काय आगरकरांच्या नव्या विचारांनीं तो भरून निघाला. आजच्या मराठी साहित्याची जिवंत परंपरा अशी आहे. गेल्या साठ वर्षांच्या काळांत उच्च दर्जाचे कलावंत असूनही ज्यांनीं विचारप्रवर्तनाचा पुरस्कर केला अशा लेखकांत हरि नारायण आपटे, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, वामन मल्हार जोशी व भार्गवराम विठ्ठल वरेरकर यांचीं नांवें प्रमुखत्वानें घेतां येतील. हरिभाऊंच्यापाशीं कादंबरीचा कायम ठसा नव्हता हेंच त्यांच्या कलाशक्तीचें मोठें लक्षण नाहीं का? त्यांची काव्यशक्ति पहायची असेल तर 'वज्राघात' कादंबरीचें पहिलें प्रकरण वाचावें. कापडदुकान व शिंप्याचें दुकान यांतील बारकावे त्यांतील मेहेरजानचें वर्णन वाचून कळणार नाहींत हें खरें! पण या प्रकरणांतील चांदण्या रात्रीचा नौकाविहार मराठी भाषेला भूषणभूत होऊन राहील. असें कलानैपुण्य अंगीं असूनही हरिभाऊंनीं मतप्रतिपादक कादंबऱ्या लिहिल्या, मध्यमवर्गातील स्त्रियांचीं गाऱ्हाणीं निद्रित समाजाला ऐकवून त्या वर्गाला जागें केलें, आणि देशसेवेसाठीं सर्वस्वाचा—सर्वांहून उन्मादक असलेल्या रमणीप्रेमाचा—त्याग करणारा भावानंद निर्माण केला. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्या प्रतिभेवर वास्तवापेक्षां अद्भुतरम्यतेचा पगडा जास्ती. अशा साहित्यिकाला मतप्रतिपादन हा कलेच्या गळ्यांतील अलंकार न वाटतां लोढणें वाटावें. पण त्यांनीं निष्ठेनें समाजसुधारणेचा पुरस्कार

केला. मतप्रतिपादनाच्या धोंड्यानें त्यांच्या कलेचा कपाळमोक्ष झाला असेंहि नाहीं. अस्पृश्यतेवर कादंबरी लिहावयाचें ठरविल्यामुळें त्याच्या श्यामसुंदर मधील बाललीलांचें वर्णन कमी सरस उतरलें आहे असें कोण म्हणेल? त्यांच्या 'सुदाम्याच्या पोह्यां'तील खमंगपणाचें श्रेय तर त्यांच्या समाजविषयक आस्थेलाच दिलें पाहिजे.

वामनराव जोशी व भार्गवराम वरेरकर या विद्यमान साहित्यिकांच्या ललितकृतीहि हेंच दर्शवितात. 'सुशीलेच्या देवां'त कांहीं कलाविषयक दोष असतील; पण या कादंबरीइतक्या विचारप्रधान नसलेल्या 'नलिनीं'त ते हिच्यापेक्षांहि अधिक नाहींत का? 'इंदू काळे व सरला भोळे' या रम्य कादंबरींत गेल्या दशकांत महाराष्ट्रीय जीवनांत खळबळ उडविणारे प्रश्न चर्चेला घेतले आहेत; पण प्रश्नांच्या मोठ्या माशांनीं कला, स्वभाव-रेखन, वाग्विलास वगैरे लहान मासे खाऊन टाकले आहेत असें कुठेंच दिसत नाहीं. वरेरकरांच्या 'विधवा कुमारी', 'हाच मुलाचा बाप', 'धांवता धोटा', 'सोन्याचा कळस' वगैरे कृती घेतल्या तरी त्यांतहि त्यांच्या मतामुळें कलेला ग्रहण लागलें असें कुठेंच दिसत नाहीं.

ललितलेखकानें आपली कलादृष्टि नेहमीं जागृत ठेविली पाहिजे यांत संशय नाहीं. एकादें परदेशी मॉडेल आणून त्याच्या नकला करण्यापेक्षां लेखकाच्या प्रतिभेंतून प्रकट होणारी जिवंत कला अधिक सरस यांत शंका नाहीं. पण आजच्या घटकेला स्टीफान झ्वाइग्‌ची हळुवार लेखनशैली, युलि-सिस लिहिणाऱ्या जेम्स जॉइसची विलक्षण नवसृष्टि अगर सूक्ष्मदर्शक यंत्रां-तून निरीक्षण केल्याप्रमाणें मध्यम वर्गाचें चित्रण करणाऱ्या सिंक्लेअर लुईसची वर्णनशक्ति यांचें डोळस अनुकरण आपल्याकडे झालें तरी तें सुद्धां हवेंच आहे. मात्र लहान मुलांनाच खरीं वाटतील असलीं पोरकट रहस्यें, वाचकाच्या भोगलोलुप वृत्तीचा फायदा घेऊन त्याचें आकर्षण कर-णारीं उत्तान वर्णनें, कथानक चालावें म्हणूनच उत्पन्न होणारीं पात्रें आणि त्यांचीं परिवर्तनें, मृगजळासारखें खोटा आभास उत्पन्न करणारें तत्त्वज्ञान, हें कलेच्या नांवाखालीं खपतां कामा नये. वास उडून गेल्याबरोबर माती-मोल होणाऱ्या स्वस्त काबुली हिंगाप्री व असल्या यांत्रिक कलेची किंमत

सारखीच. आजच्या जगांत कलेला खऱ्याखुऱ्या जीवनाची–जीवनविषयक तत्त्वज्ञानाची–जोड अवश्य हवी. कलाविलास म्हणजे कांहीं नुसतें हळदी-कुंकू नव्हे कीं तिथें कलेच्या कपाळीं सौभाग्याचा टिळा लागला म्हणजे सात जन्मांची राखण झाली! जोडप्यानें बरोबर गेलें पाहिजे असा आधुनिक समारंभ आहे तो! तिथें बक्षिसें द्यायचीं असतील तर तीं खुशाल कलेच्या हातून द्यावींत. पण हा समारंभ संमिश्रच असला पाहिजे.

ललितवाङ्मयांत जीवनविषयक तत्त्वज्ञानाची आवश्यकता मान्य केल्यानें सर्व प्रश्न सुटतात असें मात्र नाहीं. साहित्यिकाचें जीवनविषयक तत्त्वज्ञान त्याच्या सामाजिक परिस्थितीवरूनच ठरतें. आपले बहुतेक ग्रंथकार पांढरपेशा मध्यम वर्गांतील असल्यामुळें व आपल्या समाजरचनेला तुरुंगांतल्या अंधारकोठड्यांचें स्वरूप आलें असल्यामुळें त्यांना आपला वर्ग म्हणजेच आपला समाज वाटणें स्वाभाविक होतें. यामुळेंच त्यांच्या तत्त्वज्ञानाला बहुधा वृक्षावर चढून त्याला शोभा देणाऱ्या वेलीऐवजीं बांडगुळाचें स्वरूप येतें. गडकऱ्यांचा 'एकच प्याला' पाहतांना त्यांतील सुधाकराबद्दल आपण हळहळतों. सिंधूसाटीं आपण रडतों. गडकऱ्यांच्या काव्यशक्तीचा तो प्रभाव आहे. पण खरोखरच सुधाकराचीं वसंतव्याख्यानमालेंतच शोभतील अशीं व्याख्यानें एकून मद्यपानाच्या व्यसनाच्या मूलभूत कारणांचा आपणाला या नाटकांत पत्ता तरी लागतो का? सुधाकराला दारूचें व्यसन लागण्याचें जें कारण दिलें आहे तें सर्वसामान्य मानवी स्वभावाच्या दृष्टीनें कितीसें खरें वाटतें? सर्व स्वाभिमानी माणसें अपमानाची आग सुखासुखीं दारूंत बुडवायला निघतील तर आपल्या मुंबई इलाख्याचें उत्पन्न कितीतरी कोटींनीं वाढेल, आणि शिक्षणप्रसाराच्या आड येणारा पैशाचा अभाव तरी दूर होईल! नाकासमोर जाणारा माणूस नकळत दारूला कसा बळी पडतो, तो दारूला सोडण्याचा प्रयत्न करीत असतांना सुसरीप्रमाणें चिकटलेली ती बया त्याला कशी सोडत नाहीं, ज्या बायकापोरांसाटीं एरवीं तो मरायलाही तयार झाला असता, त्यांनाच तो मरेपर्यंत कसा मारतो, हें स्वाभाविक चित्र रेखाटायचेंच असेल, तर त्याकरितां पुण्यांतल्या वकिलांपेक्षां पुष्कळच पलीकडे पाहिलें पाहिजे. मुंबईचा मजूर अगर शिरोड्याचा शेतकरी हाच अशा नाटकाचा नायक होण्याला या विशिष्ट दृष्टीनें अधिक योग्य. पण

मुंबईतल्या मोठ्या चाळींतल्या शेंकडों खोल्यांत शेजारीं शेजारीं राहणारांना एकमेकांचा जसा पत्ता नसावा त्याप्रमाणें समान संस्कृतींच्या जातींत सुद्धां जिथें आमचें दळणवळण नाहीं, तिथें पोटाच्या आगींत अहोरात्र भाजून निघणाऱ्या अगर दारिद्र्यदैत्याच्या मांडीवरच धडधडत्या छातीनें डुलकी घेणाऱ्या वर्गाची आम्हांला कुठून दाद लागणार ?

काव्यासारख्या सर्वांत अधिक कल्पनाप्रधान अशा वाङ्मयविभागांतही जीवनविषयक निश्चित दृष्टिकोनाचा परिणाम कसा होता हें सहज दाखवितां येईल. माधव ज्यूलियन यांची 'संगमोत्सुक डोह' ही कविता सर्वांच्या परिचयाची आहे. वैशाखांत नदीचें पात्र कोरडें पडलें आहे, अशा वेळीं तिला प्रणयिनी मानणाऱ्या कृष्णडोहाला काय वाटत असेल याचें हृदयंगम चित्रण या गीतांत दिसतें. हेंच दृश्य पूर्वकाळच्या एखाद्या संतकवीनें पाहिलें असतें तर? त्या कृष्णडोहाची परमात्म्याशीं तुलना करून कोरड्या पडलेल्या नदीच्या पात्राकडे पाहत तो उद्गारला असता, "कुठं आहे आतां तें लाडीगोडी करणारें नदीचें पाणी ? उन्हाळ्याचें संकट आल्याबरोबर सारे सगेसोयरे पळून गेले. आतां निर्वाणीचा सोबती कोण ? हा डोह परमात्मा !" इत्यादि इत्यादि. कृष्णडोहांतल्या 'कृष्ण' शब्दावर श्लेष करण्याची संधिहि त्यानें दवडली नसती!

आजच्या समाजवादी कवीला या डोहाच्या कांठावर नेऊन उभें केलें तर संतकवीची विचारसरणी त्याला सुचेल का ? घोड्यावर बसून रणांगणाकडे जाणारा शिपाई वाटेत क्षेत्रावर उतरून संन्यास घेईल असें म्हणण्यापैकींच हा प्रश्न आहे. या कृष्णडोहाकडे पाहून साम्यवादी कवीला वाटेल, "हा डोह म्हणजे समाजांतील ऐतखाऊ वरिष्ठ वर्गच नाहीं का ? भोंवतालच्या नदीच्या पात्रानें वर्षभर जीव तोडून त्याला पाण्याचा पुरवठा केला. पण उन्हाळा येतांच तहानेनें मरणाऱ्या त्या पात्राला हा पाण्याचा थेंबसुद्धां द्यायला तयार नाहीं. पुन्हां पलीकडच्या पात्रांतून पाणी वहायला लागूं दे. तें आपल्याकडे घ्यायला मात्र हा तयार होईल. उगीच नाहीं याचें अंतरंग इतकें काळेंकुट्ट दिसत !"

लिहिणारा कवि प्रतिभासंपन्न असेल तर यांपैकीं कोणत्याहि दृष्टीनें लिहि-

लेलें काव्य वाङ्मयदृष्ट्या आनंददायकच होईल. तांबे रुद्राला आवाहन करितांना म्हणतात—

" पाड सिंहासनें दुष्ट हीं पालथीं
ओढ हत्तीवरुनि मत्त नृप खालतीं
मुकुट रंकासि दे, करटि भूपांप्रतीं
झाड खट् खट् तुझें खड्ग क्षुद्रा ! "

प्राचीन कवीच्या कल्पनेनें केवढेंहि रौद्रस्वरूप धारण केलें असतें तरी तें याच्याशीं साम्य पावणें शक्य होतें काय ? हा कालमहिमा आहे. सध्यांच्या समाजाच्या अंतःकरणाशीं समरस झालेल्या कविहृदयाचे उद्गार आहेत हे ! प्राचीन काळीं राजाश्रयावर वाढलेल्या कालिदासाची प्रतिभा निसर्गतः तांब्यांपेक्षां अनेक पटींनीं संपन्न असेल. पण हे स्फूर्तिदायक बोल त्यावेळीं तिच्या अंतःकरणांत उत्पन्न होणें शक्य होतें असें कोण म्हणेल ?

आजच्या वाढत्या मराठी वाङ्मयात जर कोणतें वैगुण्य अति तीव्रतेनें जाणवत असेल तर तें मानवी जीवनाकडे पाहणाऱ्या प्रगतिप्रेरक दृष्टीचा अभाव हेंच होय. प्रणय हा मानवी सृष्टीचा जिवाभावाचा मित्र आहे, यांत शंका नाहीं. कालिदासापासून स्टीफान झ्वाइग्पर्यंत त्याच्या भिन्नभिन्न सुंदर मुद्रांचें कोमल चित्रण होत आलें आहे आणि पुढेंहि तें होत राहील. बाणाच्या कादंबरींतील जन्मांतरींच्या कथेची अद्भुतरम्यता Aldous Huxley च्या The Brave New World मधें भविष्यसृष्टीचें वर्णन करतांना प्रगट झालेली आढळेल. विदर्भांतील भवभूतीच्या उत्तररामांतील कारुण्यमूर्ति सीतेनें वेसेक्स मधील हार्डीच्या Tess सारख्या मानसकन्येच्या रूपानें अवतार घ्यावा यांत नवल कसलें ? सहृदयता ही ललितवाङ्मयाची माता आहे हें कोण नाकबूल करील ? कल्पकता ही सहृदयतेची सख्खी बहीण. दुर्बळ सहृदयतेकडून अपत्याचें पोषण होणें अनेकदां कठिण होतें. अशा वेळीं कल्पकता प्रेमानें त्याचा प्रतिपाळ करते आणि ' माय मरो पण मावशी जगो ' ही म्हण सार्थ करून दाखविते. पण अशा रीतीनें लाडांत वाढलेलें अपत्य जगाशीं टक्कर मारण्याला समर्थ होईलच असें मात्र नाहीं. ललित-लेखकाला जीवनविषयक व्यापक दृष्टिकोन हवा असें अट्टाहासानें म्हणण्याचें कारण हेंच. आमचे अनेक

लेखक यावर तुच्छतेनें हंसून म्हणतील 'दृष्टिकोनाचें एवढें काय स्तोम माजवीत आहां तुम्ही? आम्हाला दृष्टिकोन आहे. हा कोन ॲक्यूट आहे तसा राइटहि आहे. मग भाषाशुद्धीच्या काळांत या शब्दांचें भाषांतर तुम्ही वाटेल तसें करा. आमच्या कथा, कादंबऱ्या, नाटकं हीं सारीं सामाजिकच असत नाहींत का? पुरावाच हवा असेल तर कुठल्याहि पुस्तकाचें मुखपृष्ठ पहा. 'सामाजिक' हा शब्द त्यावर अगदीं मोठ्या अक्षरांत छापलेला असतो. बिचाऱ्यांच्या हें ध्यानींहि येत नाहीं कीं 'हिंदुस्थानमा बनेलो' या छापानें खपविला जाणारा माल आणि यांचें 'सामाजिक वाङ्मय' हीं दोन्ही एकाच लायकीचीं असतात. दोन्हींचेंहि भांडवल परदेशीच! आपल्या समाजांत चाललेल्या घडामोडीची दाद असली तरच आमचें ललितवाङ्मय खरेंखुरें सामाजिक होईल. पण खालीं भुकंपाचे धक्के सुरू झाले असतांना वेधशाळेच्या गच्चीवरून ग्रहांकडे दुर्बीण लावून पाहणाऱ्या व त्या निरीक्षणावरून जगाचें भविष्य वर्तविणाऱ्या ज्योतिषासारखीच आम्हां मराठी ललितलेखकांची स्थिति नाहीं का? जीवनसमुद्रावर प्रयलकालाप्रमाणें भासणारें आर्थिक वादळ सुरू झालें आहे. पण आम्हीं अजून आपल्या नायकनायिकांना कागदी होड्यांत बसवून चांदण्या रात्रीचा आनंद लुटण्याकरितां त्या समुद्रावर पाठवायला कचरत नाहीं! हरिभाऊ आपट्यांनीं मध्यमवर्गाच्या सुधारणेंत लक्ष घातलें, श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांनीं धार्मिक जीवनांतील अंध श्रद्धेवर कोरडे उडविले आणि गडकऱ्यांनीं प्रणय-रम्यतेचा पुरस्कार केला, हें सर्व कालदृष्ट्या ठीक होतें. टिळकांचीं राजकीय आणि आगरकरांचीं सामाजिक मतें हीच त्यावेळची आमची विचारसीमा नव्हती का? पण गेल्या पावशतकांत जगांत जेवढी क्रान्ति झाली आहे तेवढी मानवतेच्या इतिहासांत कधीं काळीं झाली असेल कीं नाहीं यांची शंकाच आहे. यंत्रयुगाच्या उत्कर्षानें जगाचें रूपच पालटून गेलें आहे. चौदा वर्षांनीं पुन्हा दंडकारण्यांत गेलेल्या रामचंद्राला त्याची ओळख पटूं शकली नाहीं. मग प्रचंड महायुद्धानें, प्रगतिपर शास्त्रज्ञानानें आणि त्याच्यापेक्षांही प्रभावी अशा साम्यवादाच्या सप्रयोग होणाऱ्या तत्त्वज्ञानानें जगांत जो बदल घडवून आणला आहे, सामाजिक सुधारणेला जी नवी दृष्टि दिली आहे, आजच्या मानवजातीच्या अंतरंगावर क्ष किरण पाडून

वस्तुस्थितीचे जे पाठ शिकविले आहेत त्यांची मानवी जीवनाविषयीं लिहिणाऱ्या लेखकांना कशी उपेक्षा करतां येईल ? टिळकांना गीतेंतलें तत्त्वज्ञान पारखण्याकरितां जागतिक तत्त्वज्ञानाच्या निकषावरच तें घांसावें लागलें. समाजांत नवजीवन निर्माण करणाऱ्या आगरकरांनीं डार्विन, मिल्ल, स्पेन्सर प्रभृति पाश्चात्य पंडितांच्या विचारांचा उपयोग केलाच कीं नाहीं ? जातिभेदासारख्या मातीच्या भिंती दूरच राहूंद्यात, पण धर्मभेदाच्या दगडी व अर्थभेदाच्या चिनी भिंतीसुद्धां या नव्या युगापुढें मान वांकवीत आहेत. या कालाचें यथार्थ आकलन करायला मार्क्स–फ्रॉइड् प्रभृति आधुनिक श्रेष्ठ शास्त्रज्ञांचा डोळस अभ्यास ललितलेखकांनीं करायला नको काय ?

मार्क्स आणि फ्राइड् यांचा ललितलेखनाशीं लावलेला संबंध अनेकांना बादरायण संबंधापैकीं वाटण्याचा संभव आहे. मम्मटापासून मूल्टनपर्यंतचे साहित्यमीमांसक वाचणें योग्य आहे असें मात्र ते आनंदानें म्हणतील ! मार्क्स आणि फ्रॉइड् यांच्या अभ्यासाचा मी वर उल्लेख केला, त्याचा अर्थ फडक्यांच्या कादंबरींतील नायकानें नायिकेला प्रेमपत्राऐवजीं कॉम्युनिस्ट मॅनिफेस्टोची नक्कल करून पाठवावी, यशवंत गोपाळ जोशांच्या गोष्टींतील आजीबाईनीं नातीची समजूत घालण्याकरितां फ्रॉइडचे कामविषयक सिद्धांत पाठ म्हणावेत अगर अत्र्यांच्या नाटकांतील एखाद्या पात्रानें हातांत रसेलचा फोटो घेऊन ‘ घराबाहेर ’ पडल्यानंतर देखील त्याला ‘ साष्टांग नमस्कार ’ घालीत सुटावें असा मुळींच नाहीं. लेखक कळत नकळत भोंवतालच्या जीवनाचें जें चित्रण करतो तें वास्तव ठरायला त्याला समाजाचें तात्त्विक व मूलग्राही निरीक्षण करतां यायला नको का ? नाहींतर वेश्यांच्या मुलींचीं लग्नें लावून वेश्याव्यवसाय नाहींसा होईल, म्हातारीं खोडें मध्यें आलीं नाहींत तर हिंदुवृक्षाभोंवतीं मुसलमानी लतेचें वेष्टन पडेल, स्त्रियांनीं पतिपित्यांची पादत्राणानें पूजा सुरू केली, कीं स्त्रीपुरुषांची समता प्रस्थापित होईल, हरून–अल–रशीदचें अनुकरण करणारा संस्थानिक निघाला म्हणजे हिंदी लंकांतून रामराज्य नांदूं लागेल इत्यादि विलक्षण, विकृत वा विक्षिप्त विचारांचें पीक यायचें हें ठरलेलेंच आहे. समाजापुढील प्रश्न पूर्वीपेक्षां फार बिकट आणि गुंतागुंतीचे झाले आहेत. ते सोडविण्याला परंपरेवरील अन्धश्रद्धा, कवि-

कल्पना अगर पुस्तकी शास्त्रसंकेत बिलकूल उपयोगी पडणार नाहींत. या प्रश्नांशीं आमचा कांहीं संबंध नाहीं असें म्हणण्याचे दिवसही निघून गेले आहेत. कलाप्राधान्याला महत्त्व देणाऱ्या प्रो. फडक्यांनीं आपल्या नव्या कादंबरींत स्त्रियांच्या आर्थिक व नैतिक स्वातंत्र्याचा निरनिराळ्या रीतीनीं खल करण्याचा प्रयत्न केलाच आहे कीं नाहीं? अशा स्थितींत ललित-लेखकाला समाजाकडे पाहण्याची शास्त्रशुद्ध दृष्टि जर हवी असेल, तर मार्क्स अर्थशास्त्राच्या प्रोफेसरांनीं वाचावा आणि फ्रॉइड् डॉक्टरांनीं पहावा असें म्हणून त्याचें चालणार नाहीं. ललितसाहित्य हें कांहीं झालें तरी समाजनौकेचें सुकाणूं! या जागेची जबाबदारी न जाणणें म्हणजे समाज-द्रोह करण्यासारखेंच नाहीं काय?

गेल्या साठ वर्षांतील मराठी लेखकांनीं ह्या कर्तव्याकडे दुर्लक्ष केलें आहे असें मात्र मी मुळींच म्हणत नाहीं. पण हरिभाऊ काय अगर कोल्हटकर काय, त्यांच्या सामाजिक परिस्थितीनें व दर्जानें त्यांचा निरी-क्षणाचा कोनहि निश्चित केला. ‘श्यामसुंदर’ मधें ब्राह्मण नायक हरि-जनांत जाऊन त्यांची सेवा व उद्धार करतो असें कोल्हटकरांनीं दाखविलें, पण हें केव्हां धरलें? तर परीक्षेंत नापास होऊन बापाला भयंकर राग येण्याइतका मंदपणा श्याम दाखवितो तेव्हां! एका दृष्टीनें हें समाजचित्र अगदीं यथार्थ आहे. मध्यम वर्गांतील चटचट परीक्षा पास होणारा बुद्धिवान् मनुष्य खेड्यांतील हरिजनांच्या रात्रीच्या शाळा चालवायला जातो असें चित्र ध्येयवाद म्हणून रंगविणें अजूनही धाडसाचें आहे. नारायण हरि आपटे, यशवंत गोपाळ जोशी वगैरे खालच्या मध्यम वर्गाचे प्रतिनिधि असलेले लेखक घेतले काय अगर प्रो. फडके, पु. य. देशपांडे, यांच्यासारखे उच्च मध्यम वर्गाचें हृद्गत चित्रण करणारे लेखक घेतले काय, त्यांचे वाङ्मयगुण आकर्षक वाटतात; पण नव्या समाजसृष्टीचीं स्वप्नें त्यांना पडत नाहींत, आणि जीं पडतात त्यांचा अर्थ कुठलीहि स्वप्नकारिका करूं शकणार नाहीं. ‘सुखाच्या मूल-मंत्रा’तील व्यायामाचा अगर ‘पहांटेच्या काळोखा’तील शेतीचा उपदेश, कागदावर वाचायला ठीक आहे. पण व्यवहाराशीं त्याचा मेळ कसा बस-णार? ‘कोथिंबिरीच्या काड्यां’नीं बहीणभावंडाचीं भांडणें मिटणें जर शक्य

असतें, तर लक्षावधि कुटुंबें सुखी करण्याकरितां कोथिंबिरीची मुद्दाम लागवड करणारे समाजसेवक देखील निर्माण झाले असते! फडक्यांच्या 'दौलत' मधील निर्मला आय्. सी. एस्. धनंजयाला झिडकारून मेकॅनिकल इंजीनियर असलेल्या अविनाशशीं लग्न करते. पण अविनाश दुर्दैवानें एखादा साधा कारकून असता तर? कादंबरीकारानें त्याला गोव्याच्या लॉटरींतील पहिलें तिकीट देऊन कदाचित् निर्मलेची अडचण दूर केली असती! 'बंधनाच्या पलीकडे' गेलेला प्रभाकर प्रथमतः समाजावर यथेच्छ तोंडसुख घेतो; पण मैनेशीं लग्न लागल्यावर मग त्याला बंधनाच्या अलीकडल्या समाजाची आठवणच होत नाहीं !

उच्च मध्यमवर्ग असो अगर खालचा मध्यमवर्ग असो, त्यांचें तोंड, सद्यस्थितींत वरिष्ठ वर्गाकडेच वळलेलें असतें. उच्च मध्यमवर्गाची स्थिति स्वर्गात जाऊं इच्छिणाऱ्या त्रिशंकुप्रमाणेंच नाहीं काय? त्याच्या साऱ्या इच्छा वरिष्ठ वर्गाशीं समरस होण्याच्या, समाजशिखरावरील त्या वर्गाप्रमाणें निष्काळजी व विलासी जीवन कंठण्याच्या असतात. खालच्या मध्यमवर्गाची पाठ श्रमजीविवर्गाच्या पाठीला अगदीं लागलेली असते खरी, पण ज्या संसारांत दोन डोळे शेजारीं असूनही त्यांची भेट होत नाहीं तिथें डोळे नसलेल्या पाठी नुसत्या स्पर्शानें एकजीव कशा होणार? उच्च मध्यम वर्गाच्या विलासी उड्या या वर्गाला शक्य नसल्यामुळें तो प्रचलित अंधनीतीचा पुरस्कर्ता व वरिष्ठ वर्गाकडे थोड्याशा उपहासानें पाहणारा होतो. सामाजिक रोगांवरील वरवरच्या मलमपट्टया याच वर्गातील लेखकांच्या दवाखान्यांतून बाहेर पडतात.

या दोन्ही वर्गांतील सहृदय व कलाकुशल लेखकांनीं आजपर्यंत—आपल्या संकुचित क्षेत्राचें कां होईना—भूतदयेनें निरीक्षण केलें आहे. मराठी भाषेच्या भावी इतिहासकाराला त्यांचीं नांवें आदरानेंच घ्यावीं लागतील. पण आजच्या पिढीनें त्यांच्या पावलांवर पाऊल टाकून जाणें केव्हांही इष्ट होणार नाहीं. वाहतें पाणीच जसें पिण्याला योग्य त्याप्रमाणें प्रवाही जीवनांतून निर्माण झालेले ग्रंथच समाजाला मार्गदर्शक ठरतात. पुस्तकापासून स्फूर्ति घेऊन निर्माण झालेलें पुस्तक हें सांठलेल्या पाण्याप्रमाणें निर्जीव,

अशुद्ध व प्रसंगीं उपद्रवीही होतें! स्वतंत्र दृष्टीनें आजची पिढी जर आपल्या सामाजिक जीवनाकडे पाहूं लागली, तर तिला काय दिसतें? आतां नुसत्या भूतदयेच्या चित्रणानें काम भागणार नाहीं. पायां-तल्या बेड्या सैल केल्या म्हणजे कैदी सुखी होतो का? लेखकांच्या मनांतील भूतदयेचें रूपांतर नवी समाजरचना निर्माण करण्याच्या प्रबळ इच्छेंत झालें तरच त्यांच्या वाङ्मयाला आजच्या घटकेला खराखुरा जिवंत-पणा येईल. या बंडखोर मनोवृत्तीचे अंकुर मराठी वाङ्मयांत बरेच दिवस आढळत असले तरी त्यांची वाढ होण्याला सध्यांच्या इतका अनुकूल काल कधींच आला नव्हता. विचारवंत ललित लेखकाची कला नेहमीं एकच धर्म मान्य करते. तो म्हणजे मानवधर्म. या मानवधर्माच्या निशाणा-खालीं उभें राहून मानवी जीवनाचा प्रवाह दूषित करणाऱ्या हरतऱ्हेच्या विषाविरुद्ध मोहीम करणें याच्यापेक्षां अधिक उच्च असें कोणतें ध्येय जगांत असूं शकेल? प्राचीनकाळीं काव्यविषय हिरेमाणकांप्रमाणें फक्त राजवाड्यांत सांपडत. आतां ते कारखान्यांत आणि खोपट्यांत मिळूं लागले आहेत. पूर्वीचा ललितलेखक व्यक्तीच्या द्वारें तिचें सुखदुःख दर्शवीत असे. आतांच्या लेखकाला व्यक्तीच्या मुखानेंच कां होईना, सामाजिक सुखदुःखें चित्रीत करण्याची संधि मिळत आहे. यामुळें त्याच्या कलेचें क्षेत्र अधिक अधिक विस्तृत होत आहे हा मोठाच फायदा नव्हे का? 'उत्तररामचरित्रां'-तील सीतात्यागाच्या करुण सुंदर प्रसंगाचा पाया काय? तर एका परटाची बडबड! (तो कदाचित् दारूहि प्याला असावा!) तेंच इब्सेनचें Enemy of the people हें नाटक पहा. त्यांतील डॉ. स्टॉक्मनची शेवटच्या अंकांतील स्थिति रामाच्या इतकीच करुणाजनक आहे. पण या हृदयस्पर्शी प्रसंगाचा पाया कुठेंतरी कच्चा वाटतो का? केवळ वैयक्तिक सुखदुःखापेक्षां सामाजिक सुखदुःखाचें चित्रण संमिश्र मानवी समाजाला दिवसेंदिवस अधिक प्रभावी वाटूं लागावें यांत आश्चर्य कसलें?

कला काय अगर समाजजीवन काय, दोन्हींचेंहि मानवजातीच्या उच्च भूमिकेवरून चित्रण करायचें म्हटलें, कीं आजच्या लेखकांना सामाजिक बंडखोरी केलीच पाहिजे. सामाजिक बंडखोरी या शब्दानें सरस्वती-मंदिरांतील सोंवळें भ्रष्ट होतें असें मानणारे लोक आपल्याकडे कांहीं थोडे

थोडके नाहींत. नुक्तीच 'पावित्र्यविडंबना'ची हांकाटी करण्याची जी एक सनातनी फॅशन निघाली आहे–ती त्यांतलीच. पुष्कळदां पावित्र्याचें विडंबन होण्याऐवजीं पावित्र्य हेंच मूर्तिमंत विडंबन असतें, ही गोष्टहि हे पढिक पंडित विसरून जातात! ज्या धर्मानें गणपति निर्माण केला, त्यानेंच हरिजनांना दूर लोटलें, कामकऱ्यांना अज्ञान–राक्षसाच्या हवालीं केलें, बायकांना स्वयंपाकघर बहाल केलें आणि प्रगतीच्या मार्गावर भलभलत्या विधिनिषेधांचे कांटे पसरून सर्व समाजाला नुसत्या विचाराच्याच नव्हे, तर खऱ्याखुऱ्या पारतंत्र्यांत टाकलें. या उरफाट्या पावित्र्याचें प्रायश्चित्त आधीं घ्या, आणि मग गणपतीच्या विडंबनाबद्दल प्रायश्चित्तें देण्याच्या पेशवाई गोष्टी बोला, असा एखाद्यानें या पंडितांना रोखठोक सवाल केला तर त्यांत काय चूक आहे? बुद्धिवादाच्या नव्या जगांत बिचाऱ्या ईश्वराला रहायला जागा मिळेल कीं नाहीं अशी स्थिति एकीकडे आली आहे. अशा वेळीं गणपतीच्या वतीनें बेअब्रूची फिर्याद शारदामंदिरांत केली तर तिची पंचाईत कोण करीत बसणार? बेशुद्ध धन्याला शुद्धीवर आणण्याकरितां डॉक्टरी सल्ल्याप्रमाणें नोकरानें बुटाच्या तडातड लाथा मारल्या म्हणजे तो धन्याचा अपमान होतो असें समजायचें कीं काय? ज्या गणपतीनें आजपर्यंत नवरसयुक्त पदें शांतपणानें ऐकून घेतलीं त्याला आपल्या बाजूनें फुकट वकिली करणाऱ्या या लोकांची खास कींव येत असेल.

पावित्र्यविडंबनाच्या हांकाटीचें दुसरें टोंक वाङ्मयांतील नवमतवाद. नवमतवाद हा नेहमीं बंडखोरच असायचा. पण बंडखोर यशस्वी झाला कीं तो छत्रपति होतो हा महाराष्ट्राचा अनुभव आहे. गेल्या तीन वर्षांतील वाङ्मयिक नवमतवादाकडे पाहिलें तर या निशाणाखालीं निरनिराळ्या हेतूंनीं गोळा झालेले लोक आढळतील. कारखान्यांतील सत्ता एकट्या मालकाच्याच हातांत असावी असें गोष्टींतून सांगणारे लोक स्वतःला नवमतवादी म्हणवितात; कारण स्त्रियांच्या बाबतींत पत्नीवर एकट्या पतीची मालकी असणें त्यांना संमत नसतें! कुणी आपल्या नियतकालिकांचा खप वाढतो म्हणून, तर कुणी आपली कामविषयक विशिष्ट मतें प्रतिपादन करतां यावींत म्हणून, कुणी स्वतःच्या चरित्राचें मंडन करण्याकरितां येतील

तर कुणी आप्तेष्टांच्या इच्छेकरितांही नवमतवादी झालेले आढळून येतील! पुराचें पाणी प्रथम गढूळ असायचेंच! तेव्हां प्रचलित परिस्थितीबद्दल खेद करण्यांत अर्थ नाहीं. पण हा वाङ्मयिक नवमतवाद दिवसेंदिवस व्यापक होत जाऊन शून्य हृदयापासून रिकाम्या पोटापर्यंतचे सर्व प्रश्न त्यांत अंतर्भूत होतील असें म्हणायला हरकत नाहीं.

मराठी ललितवाङ्मय कलायुक्त पण त्याचबरोबर कणखर व कर्तृत्ववान व्हावें या सदिच्छेनें आतांपर्यंत ही थोडीशी चर्चा केली. याचा अर्थ मला ललितवाङ्मयाची कोमल कलात्मकता कळत नाहीं, अगर सरस्वतीच्या मंदिराला तालमीच्या आखाड्याचें स्वरूप आणण्याची पहिलवानी इच्छा माझ्या मनांत आहे असा अर्थ मात्र कृपा करून करूं नये. साहित्य-क्षेत्रांतील राजांनीं राज्याला आग लागून लोक रडत–ओरडत असतांना गवयांशीं रागचर्चा करीत बसणें गैर आहे, एवढेंच मला सुचवायचें होतें. ललितवाङ्मयाची सरहद्द संगीत आणि चित्रकला यांच्यापासून सुरू होते ती थेट समाजशास्त्र आणि अर्थशास्त्र यांच्यापर्यंत जाऊन भिडते. ‘ अर्धनारी नटेश्वरा ’सारखें या सारस्वताचें स्वरूप आहे. शंकराच्या राखेनें भरलेल्या जटाभाराकडे पाहून मुरडणारानें त्यांच्या शेजारींच विलसणाऱ्या पार्वतीच्या सुंदर केशकलापाकडे लक्ष द्यायला नको का? कल्पकता आणि सहृदयता हे बोलूनचालून ललितवाङ्मयाचे प्राण. त्यांची किंमत कालिदासाच्या वेळेइतकीच आहे, व मानवी जीवनांत ती नेहमींच तशी राहील. शब्द-लालित्य, अर्थगौरव, कल्पना–चमत्कृति, रसविलास या सर्वांचें ललित-वाङ्मयांतील स्थान अजरामर आहे. ग्रह, तारका, आकाशगंगा, विजा या सर्वांना रजनीच्या मंदिरांत मानाचें स्थान नाहीं असें कोण म्हणेल? काजव्यांची लुकलुक आणि रातकिड्यांची किरकिर यांचेंहि कौतुक करणारी निशादेवी या सौंदर्यनिधानांना कधींच दूर लोटणार नाहीं. पण या सौंदर्यसंमेलनांत चंद्राच्या उदयानें जशी भर पडते, तशीच जीवनविषयक तत्त्वज्ञानानें ललितवाङ्मयाची मोहकता अधिकच प्रभावी ठरेल. अर्न्स्ट टोलर याच्या ‘ Masses and Man ’ ‘ Blind Goddess ’ वगैरे नाट-कांत साम्यवादाचा घनगंभीर ध्वनि घुमत असला अगर ऑर्थर स्क्रिझलरच्या

लघुकादंबऱ्यांतून फ्राइडचें मनोगाहन चमकतांना दिसलें म्हणून तीं वाचतांना त्यांची गोडी कमी झाली आहे काय ?

मराठी साहित्याचा भविष्यकाल उज्ज्वल व्हावा या एकाच हेतूनें थोडें स्पष्ट बोलण्याचें व माझ्यापेक्षां अनेक दृष्टींनीं श्रेष्ठ असलेल्या कांहीं लेखकांवर टीका करण्याचें धाडस मीं केलें आहे. लेखकाला पोट असतें हें खरें, पण जिवंत लेखन हा निव्वळ पोटाचा धंदा होऊंच शकत नाहीं. दाईपणा हा धंदा होतो; आईपण होत नाहीं. आई होण्यांत कांहीं ना कांहीं त्याग, स्वार्थविस्मृति आहेच आहे. जागतिक वाङ्मयांत अढळपदावर जाऊन बसलेले कोणतेही लेखक घ्या. मनुष्यमात्राचें खरेंखुरें जीवन, त्याचे अनुभव व त्याचीं स्वप्नें, त्याची धडपड व तडफड, त्याचें गरुडासारखी भरारी मारणारें मन आणि अरुणासारखे पांगळे असलेले पाय, त्याचे जय आणि अपजय, त्याच्या लहानमोठ्या विविध भावना यांचें सहृदयतेनें चित्रण करण्यांतच त्यांनीं धन्यता मानली आहे. मनुष्याचा आणि मानवजातीचा विकास करण्याकरितां निर्दय निसर्गाशीं आणि कठोर वस्तुस्थितीशीं लढतांना लागलेल्या वारांकडे त्यांच्यांपैकीं अनेकांनीं भूषणें म्हणून पाहिलें आहे ! आपले वैयक्तिक अनुभव कलात्मक रीतीनें मांडतांना या धर्मयुद्धाला शक्य तें साहाय्य करणें, हें ललितलेखक म्हणवून घेण्यांत भूषण मानणाऱ्या प्रत्येकाचें कर्तव्य आहे. या धर्मयुद्धांतील समतेचा ध्वज व्यास, वाल्मीकि, भवभूतीपासून टॉलस्टॉय, इब्सेन, ब्रियोपर्यंत अनेक सेनापतींनीं हातीं धरून सुरक्षित ठेवला आहे. या झेंड्याखालीं लढण्याचा मान कुणाला लहानसहान वाटेल ? धारातीर्थीं पडणारा वीर अमर होतो, हें निदान या युद्धासंबंधानें तरी निश्चितपणें सांगतां येईल. सतराव्या शतकांतील मराठ्यांच्या वंशजांना शोभेल असा पराक्रम या विसाव्या शतकांत साहित्यासारख्या महत्त्वाच्या रणक्षेत्रांत मराठी प्रतिभेकडून व्हावा, यापेक्षां या संमेलनप्रसंगीं दुसरी कोणती इच्छा व्यक्त करावयाची ?

# सोलापूर जिल्हा साहित्यसंमेलन

अधिवेशन पहिलें

ऑक्टोबर १९३६

प्रिय बंधु-भगिनींनों,

आपल्या जिल्ह्याच्या या पहिल्या साहित्य-संमेलनाचें अध्यक्षस्थान मला देऊन जो आप्तभाव आपण प्रगट केला आहे त्याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहें. समुद्राला मिळणाऱ्या खाडीनें आपल्या पाण्याचा अभिमान काय म्हणून मिरवावा? समुद्राच्या भरतीलाच तें श्रेय दिलें पाहिजे. मराठी वाङ्मयाची मनासारखी सेवा माझ्या हातून अद्यापि झाली नाहीं. आपणासारखी मित्रमंडळी प्रेमानें बोलावूं लागली म्हणजे मात्र आपल्या बोलावण्याला पात्र ठरण्यासाठीं कांहींतरी करावें अशी तीव्र इच्छा मनांत उत्पन्न होते.

आज आपण माझ्याविषयीं जो सद्भाव कृतीनें व्यक्त केला आहे ती कांहीं केलेल्या कामाची बिदागी नाहीं, तर पुढील कामाचा विसार आहे हें मी आनंदानें कबूल करतों. असलीं संमेलनें म्हणजे मराठी वाङ्मया-विषयीं बहुजनसमाजाला किती प्रेम वाटूं लागलें आहे याचीं प्रत्यंतरेंच होत. बडोद्यापासून गोमंतकापर्यंत आणि मुंबईपासून हैद्राबादपर्यंत वाङ्मय-प्रेमाच्या सरी शाळा कॉलेजांतून आणि संमेलनांतून नित्य नियमानें येऊं लागल्या आहेत. साहित्य-क्षेत्रांतल्या कार्यकर्त्यांना उन्हाळा मागें पडला

हें आतां सांगायलाच नको. पेरणीचा हंगाम निश्चित सुरू झाला आहे. प्रत्यक्ष पिकें पाहण्यापेक्षांही हा काळ एका दृष्टीनें अधिक महत्त्वाचा असतो हें काय मीं सांगायला हवें ?

मराठवाड्याला लागून असलेल्या आपल्या या जिल्ह्यांत विविध वाङ्मयसेवा करणारे अनेक लहानमोठे साहित्यिक आहेत. आजचे स्वागताध्यक्ष डॉ. किर्लोस्कर वृद्धापकाळींही तरुणाच्या निर्भयपणानें अस्पृश्यतेवर कुठार चालवीत आहेत, तर प्रि. ना. म. पटवर्धन इंदूबरोबर लहान होऊन तिला आदर्श शिक्षण देत आहेत. कवि कुंजविहारींचा सिंहगडाचा पोवाडा महाराष्ट्रांत सर्वपरिचित आहे. कामतकरांचे तीन शहाणे बरीच वर्षें बेपत्ता झाले आहेत. पण ते मूळचे सोलापुरचेच ! कथालेखक, नाटककार, कवि इत्यादि रूपांनीं आपल्या जिल्ह्यांतील अनेक मंडळी माझ्यासारख्या दूरस्थालाही मधून मधून भेटत असतातच. असलीं संमेलनें या सर्व लेखकांना सुसंघटित करूं शकतील, तर मराठी वाङ्मयांतील उणीवा भरून काढायला त्यांचें निःसंशय साहाय्य होईल. वाङ्मयविषयक वैयक्तिक प्रयत्न अनेकदां ओढ्यासारखे असतात. उत्साहाच्या वेळीं ते वेगानें चालतात. पण त्यांना बारमाही पाणी कुठून येणार ? असे ओढे एका नदीला मिळत असले म्हणजे त्यांचा प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष उपयोग होतो. मराठी साहित्याच्या सागराला मिळणारी एक सुंदर नदी या जिल्ह्यांतून सतत वाहत राहावी असें कुणाला वाटणार नाहीं ?

आजचें मराठी वाङ्मय मला स्वतःला अनेक दृष्टींनीं आशाजनक वाटतें परिस्थिति पूर्णपणें अनुकूल नसूनही केळकर, वरेरकर, फडके वगैरेंचें लेखन—वैपुल्य पाश्चात्य लेखकांच्या तोडीचें आहे. नाहीं का ? लघुकथा, लघुनिबंध, एकांकिका वगैरे नवीन वाङ्मय—प्रकार आत्मसात् करण्याच्या दृष्टीनें ललितलेखक जसे अधिक यशस्वी होत आहेत, त्याप्रमाणें बालवाङ्मय, शालावाङ्मय व विज्ञान-वाङ्मय यांच्यांतही अधिक चतुरस्रपणा दिसून येत आहे. पर्वताचें शिखर अजून फार दूर आहे हें खरें, पण पूर्वीपेक्षां आपलें क्षितिज विस्तृत झालें आहे यांत शंका नाहीं. मात्र, पुढील चढण चढतांना तुटलेले कडे आणि निसरड्या वाटा यांच्याकडे पूर्वीपेक्षांहि अधिक लक्ष दिलें पाहिजे; त्याकरितां मी प्रथम ललितवाङ्मयाकडेच वळतों.

ललितवाङ्मयाच्या स्वरूपासंबंधीं सध्यां मराठी साहित्यिकांत चालू असलेले वाद पाहून हत्ती पहायला गेलेल्या आंधळ्यांची रसिक वाचकांना आठवण होण्याचा संभव आहे. त्या आंधळ्यांच्या निधड्या छातीबद्दल कुणीही त्यांचें निःसंशय अभिनंदन केलें असतें. पण छाती म्हणजे कांहीं दृष्टि नव्हे! आंधळ्यांच्या गजावलोकनाचें हें दृश्य खरोखरच गमतीदार दिसलें असेल नाहीं? उंच आंधळ्याच्या हातीं हत्तीचा कान लागतांच तो आनंदानें ओरडला असेल, "हत्तीला हे लोक इतके भितात कां बुवा? नुसतं सूप आहे हें सूप!" टेंगू आंधळा बहुधा हत्तीच्या पायापाशीं धडपडत असावा! त्याला हत्ती खांबासारखा भासला असेल यांत आश्चर्य कसलें? बाकी आपले कान दुसऱ्याच्या हातीं जाऊं देणारा हा हत्ती मात्र बहुधा लांकडी अगर दगडी असावा! नाहींतर ही आंधळ्यांची माळ भीक मागायला पुढें जिवंतच राहिली नसती! ही गोष्ट लिहिणारा सुखांतकथानकाचा पुरस्कर्ता असावा. नाहींतर या गोष्टीचा शेवट सहाही नायकांच्या मृत्यूंत खास झाला असता!

या वादाचें स्वरूप समजण्याकरतां शाकुंतलाचेंच उदाहरण घ्या. गटेसारख्या महाकवीला तें वाचून हर्षवायु झाला. सामान्य रसिकही कालिदासाच्या प्रतिभा—लतेवर उमललेल्या या अमरपुष्पाच्या सुगंधानें शतकानुशतकें मोहित होत आला आहे! पण शाकुंतलाच्या या मोहिनीची मीमांसा करण्याकरतां आपण रवींद्रनाथ टागोर, प्रो. फडके व कॉ. डांगे यांच्याकडे गेलों तर आपली त्रेधा झाल्याशिवाय राहणार नाहीं. रवींद्रनाथ म्हणतील, 'शाकुंतलांत प्रारंभींचें तरुण सौंदर्य मंगलमय परिणतींत कृतार्थ होऊन, मर्त्य लोकांचें स्वर्गलोकाशीं मीलन करून देतें.' रवींद्रांचें हें उदात्त तत्त्वज्ञान डोक्यांत शिरलें नाहीं तरी तें मान डोलावण्याच्या लायकीचें आहे असें वाटतें न वाटतें तोंच प्रो. फडके सांगतील, 'एक राजा शिकारीकरितां रानांत गेला; परंतु वाट चुकल्यामुळें भलतीच शिकार करून तो कसा परत आला हें जाणण्याची आपली इच्छा असते, म्हणून आपण शाकुंतल वाचतों!' शाकुंतल हें एका सुंदर शिकारीचें वर्णन असें कबूल करायला तयार व्हावें तोंच कॉ. डांगे बजावतील गिरगांवांत शाकुंतल नाटक दाखविलें तर

प्रेक्षकांचें लक्ष शकुंतला आपल्या चोळीची गांठ सैल करते त्या प्रसंगावर खिळून राहील ! तो प्रसंग ते दुर्बिणीनें पाहतील. अंगठी मिळवून देणाऱ्या कोळ्याला पन्नास फटके बसल्याचें त्यांना कांहींच वाटणार नाहीं, उलट परळच्या भागांत तें नाटक दाखविलें तर धीवराला फटके बसतांना पाहून सर्व प्रेक्षक खवळून जातील. गडकरी तर शाकुंतलाची रचना समद्विभुज-त्रिकोणासारखी करण्यांत कालिदासानें किती कौशल्य व्यक्त केलें आहे हें रसभरितपणानें वर्णन करीत असत. स्वर्गांत गडकऱ्यांच्या समक्ष कालिदास व युक्लिड यांची गांठ पडून कदाचित् यासंबंधीं मोठा वादही झाला असेल !

हे सर्व आधुनिक रसिक झाले. प्राचीन काळच्या पंडितांची गोष्ट तर विचारायलाच नको. त्यांनीं शाकुंतलाचा चवथा अंक कधींच सर्वश्रेष्ठ ठरवून टाकला आहे, आणि प्लँचेटवर येऊन आपलें मत बदललें असल्याचें त्यांनीं सांगितलें अशी बातमी अजून कुठल्याही वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालेली नाहीं. चवथा अंक त्या सर्वांना इतका आवडण्याचें कारण ते वृद्ध होते किंवा त्यांना मुलीच फार होत्या असेंही एखादा तर्कशास्त्री अनुमान काढील ! हे सर्व नवे जुने रसिक आपआपल्या दृष्टीनें खरोखरच बरोबर आहेत. पण दोन अर्धवट माणसें मिळून जसा एक शहाणा होत नाहीं, त्याप्रमाणें दोन अर्धसत्यें म्हणजे कांहीं एक पूर्णसत्य नव्हे ! कदाचित् दोन अर्धसत्यांची बेरीज पूर्ण असत्य मात्र होऊं शकेल ! " आपल्या वडिलधाऱ्या माणसांना न पुसतां आपल्या मनानें असा नाचरेपणा केला म्हणजे त्याचा परिणाम हा असा व्हायचाच " या शार्ङ्गरवाच्या वाक्याचा आधार घेऊन कालिदासाला प्रणय-विवाह मान्य नव्हते असें अद्यापि कुणीं प्रतिपादलें नाहीं हें कविकुल-गुरूचें भाग्य म्हणायचें ! कालिदासाची कलाकुशलता यांतच आहे कीं, फडक्यांना आवडणारी शिकार त्यानें जशी आपल्या नाटकांत घातली आहे, त्याप्रमाणें रवींद्रांना हवा असलेला स्वर्गहि त्याच्यांत आहे. मदनाच्या राज्यांतील शिकारीचा कैफच केवळ त्याला वर्णन करायचा असता तर, शाकुंतल तीन अंकीच झालें असतें. किंबहुना महाभारताच्या पावलावर पाऊल ठेऊन कालि-

दासानें नाटक लिहिलें असतें तर आकाशवाणीच्या अद्भुत प्रसंगांतच त्याची परिसमाप्ति करणें परिणामकारक झालें असतें. त्या नाटकांतहि रम्यता भासली असती, चमत्कृति दिसली असती, पण मानवी जीवनाचे हरतऱ्हेचे पडसाद मात्र ऐकूं आले नसते. वीज आपल्या सहज नृत्यानें आकाशाचा कानाकोपरा उजळून टाकीत नाहीं का? भावनाशील मानवी हृदयाची लहानसहान कंपनेंहि कालिदासानें आपल्या या कृतींत अशींच कायमचीं चित्रित करून ठेविलीं आहेत. सिंहाचे दांत मोजूं पाहणाऱ्या बाल सर्वदमनाच्या चित्राजवळ पाळलेल्या मुलीची सासरीं पाठवणी करतांना गळा दाटून आलेल्या वृद्ध कण्वाचें चित्र किती मनोरम दिसतें! अनसूया व प्रियंवदा आणि शारद्वत व शार्ङ्गरव या जोड्या किती भिन्न पण परस्परपूरक आहेत! ललितकृतीच्या शेवटीं आनंदीआनंद करणारा एखादा आधुनिक लेखक शाकुंतलात या अनुरूप जोडप्यांचीं लग्नें कालिदासानें कां लावलीं नाहींत असा आक्षेपहि घेईल या भूमिकांवर! विदूषक, धीवर किंवा गौतमी हीं अगदीं दुय्यम स्वभावचित्रेंसुद्धां किती हळुवार हातानें आणि मानवी रसानें कविकुलगुरूनें रंगविलीं आहेत. किंबहुना मनुष्यांच्याहि पलीकडे जाऊन शकुंतलेचा ओचा धरून ओढणारें चिमुकलें हरिण आणि तिची आवडती मोगरीची वेल यांचा आपल्या चित्रणांत अंतर्भाव करून उत्कट मानवी भावना किती विश्वव्यापी असतात, हें त्यानें सहजासहजीं सूचित केलें आहे.

असें असूनही शाकुंतलाचें रसग्रहण करतांना निरनिराळ्या रसिकांच्या मनांत पूर्वपश्चिमेइतकें अंतर कां दिसतें? वाचकाचें जग कांहीं झालें तरी लेखकापेक्षां लहानच असायचें हेंच खरें! चित्रांतील प्रत्येक मोहक रेषा अगर प्रत्येक मनोहर रंगछटा एकूण एक प्रेक्षकाला कळलीच पाहिजे असा हट्ट धरणें वेडेपणाचेंच नाहीं का? ललित कृति वाचताना वाचकाची जी आतुर मनःस्थिति असते तिला समुद्रकांठच्या खाडीची उपमा देतां येईल. समुद्राला भरती आली कीं खाडीलाही भरती येते. पण खाडीची भरती ही तिच्या पात्राच्या स्थितीवर अवलंबून राहते. मधेंच उंच वाळवंट असलें तर मोटी भरती येऊनही ती जागा कोरडीच राहील. समुद्र-

किनाऱ्यावर लाटांचें तांडवनृत्य सुरू नसलें तरी खाडीच्या कांठावर त्यांतला उन्माद दिसलच असा नियम नाहीं. मूळ प्रकृति, परिस्थिति व व्यक्तिमत्ता यांच्या भिन्नत्वामुळें वाङ्मयाचा आस्वाद घेणाऱ्यांत हें वैचित्र्य दिसून येतें असें नाहीं. ललितवाङ्मय निर्माण करणारांत तर तें अधिकच आढळतें. कालिदासानें शाकुंतलाऐवजीं उत्तरराम-चरिताचें कथानक कां निवडलें नाहीं याला दुसरें उत्तर काय देणार? गॅल्सवर्दी-शॉ, रवींद्र-शरश्चंद्र, टर्जिनेव्ह-डोस्टोव्हेस्की, सिंक्लेअर लुई व अपटन् सिंक्लेअर, आपटे-कोल्हटकर, आणि जवळचें व आजचें उदाहरण द्यायचें म्हटलें तर फडके-वरेरकर या एका काळांतील एका देशांतील किंब-हुना एकाच दिशेनें जीवनाचा प्रवास केलेल्या अगर करणाऱ्या साहित्यि-कांच्या जोडया घेतल्या तर त्यांच्यांतलें भिन्नत्वच डोळ्यांत भरत नाहीं का? वरेरकर स्त्रियांच्या स्वातंत्र्याचे कैवारी आहेत आणि फडके बायकांना अगदीं गोषांत ठेवावें या मताचे आहेत असें थोडेंच आहे! पण स्त्रीस्वातंत्र्याच्या प्रश्नावर लिहिलेल्या 'गोदू गोखले' व 'उद्धार' या त्यांच्या कादंबऱ्यांत, त्या दोन्ही कादंबऱ्या आहेत एवढेंच फार तर साम्य दाखवितां येईल. घार आणि कबूतर यांची तुलना करण्यापैकींच प्रकार आहे हा! लेखकाचें व्यक्तित्वच ललितवाङ्मयांत अधिक प्रमाणांत प्रतिबिंबित होतें हाच असल्या अनुभवांचा निष्कर्ष नाहीं काय? जी ललितकृति कालिदास रंगवायला बसला तिच्यांत त्यानें आपल्या परिणत प्रतिभेचें व संस्कारक्षम व्यक्तिमत्तेचें सर्वस्व ओतण्याचा प्रयत्न केला, म्हणूनच शाकुंतलाइतकें हृदयंगम झालें. त्यांत प्रणयाच्या विलासाबरोबर त्याचा विकासही आहे. शाकुंतलांत कथानकाची चमत्कृति जशी भावनांच्या भरतीला शोभा आणीत आहे, तसा व्यवहाराला ध्येयवाद उज्ज्वल करीत आहे. चंद्र नुसता कला-वंतच आहे. पण त्याच्या सर्व कला विकसित झाल्या कीं सौम्य सूर्यप्रका-शाचाच भास होतो. कलेच्या विविध विलासाला असेंच जीवनाचें सर्वस्पर्शी चित्रण करतां येतें.

कला व जीवन हे शब्द ऐकले कीं कांहीं पित्तप्रकृति लोकांचीं तोंडें अगदीं वेडीवांकडीं होतात. असल्या लोकांना सूतशेखराचें सेवन कर-ण्याला सोडून दिलें तर लालजी पेंडसे, फडके, पु. य. देशपांडे, वरेरकर,

काणेकर प्रभृति साहित्यिकांकडून गेल्या वर्षांत या वादाची झालेली चर्चा मराठी वाङ्मयाच्या प्रगतीला उपकारक होईल असेंच इतरांना वाटेल. कांहीं कांहीं शब्दांचा अतिपरिचयामुळें कंटाळा येणें स्वाभाविक आहे, पण कचेरींत 'सर' या शब्दाला कंटाळलेल्या कारकुनानें वरिष्ठाशीं बोलतांना या शब्दावर बहिष्कार टाकला तर त्याचा शेवट सध्यांच्या बेकारीच्या काळांत आत्महत्येंतच होईल हें सांगायला एखादा भडक लघुकथा लिहिणारा लेखकच कशाला हवा? अतिपरिचयामुळें सगळ्या शब्दांचा कांहीं वीट येत नाहीं हें प्रेमापासून परमेश्वरापर्यंत कशाच्याही भजनीं लागलेले लोक सांगूं शकतील. मग बिचाऱ्या कला व जीवन या शब्दांनींच असा काय सरस्वतीचा मोर मारला आहे कीं त्यामुळें ते सोवळ्या लेखकांना अगदीं अस्पृश्य वाटावेत?

या कला–जीवन वादांत प्रतिवादी म्हणून माझें नांव दाखल झालें आहे. कित्येकांच्या मतें मीच नंबर एकचा प्रतिवादी आहें. सोडत, शर्यत, परीक्षा इत्यादिकांत नंबराचें महत्त्व असेल. पण चर्चेंत त्याला काय किंमत? न्यायमंदिरांत प्रतिवादीचें पहिलें काम कैफियत देणें हें असतें. कैफियतींत आपल्यावरील प्रत्येक आक्षेपाला 'नाहीं–नाहीं' असें म्हणत जायचें असा न्यायमंदिराचा संप्रदाय असतो. पण सरस्वतिमंदिरांत तो न पाळणेंच बरें! न्यायमंदिराच्या पद्धतीप्रमाणें निरनिराळ्या देशांतील टीकाकार व प्रोफेसर माझ्या बाजूचे साक्षीदार म्हणून आपल्यापुढें उभे करण्याचाही आज माझा विचार नाहीं. एक तर या साक्षीदारांची उलट तपासणी होऊं शकत नाहीं; दुसरें, युरोप–अमेरिकेंतून अनेक साक्षीदार आणण्याला जें विद्वत्तेचें थोडेंफार भांडवल जवळ हवें तें माझ्यापाशीं नाहीं. कांहीं इंग्रजी ग्रंथांच्या प्रस्तावना वाचून त्या उसन्या भांडवलावर धंदा करावा म्हटलें तर एखादे वेळीं आपलेच साक्षीदार आपल्यावर उलटतात असा इतरांप्रमाणें मलाही अनुभव यायचा!

पण साखर गोड असते हें सिद्ध करण्याला रसायनशास्त्रज्ञाची अगदीं ईश्वरसाक्ष घेतलीच पाहिजे का? वनस्पतिशास्त्र जास्वंदी व गुलाब यांचें वर्गीकरण वाटेल तसें करो! सुगंधाचा भोक्ता गुलाबाचें फूल तोडून

त्याचाच वास घेईल. काजव्यांविषयीं शास्त्रज्ञांचें काय मत आहे हें कळलें नाहीं, म्हणून पाळण्यांतल्या पोरापासून आरामखुर्चीतल्या आजोबापर्यंत सर्वांना त्याच्या चिमुकल्या विमानक्रीडेचें कौतुक वाटतेंच कीं नाहीं ? इतर भुकांप्रमाणें कलेचीहि भूक प्रत्येक मनुष्याला असते व परिस्थितीप्रमाणें ती तो तृप्त करून घेतोहि. खेड्यांतला शेतकरी लावणीचा एखादा चरण गुणगुणत शेतांतलें काम करील. उलट कॉलेजांतील विद्यार्थी मासिकाच्या नव्या अंकांतील भावगीताचें गायन स्नानगृहांत सुरू करील; एवढाच काय तो फरक. सामान्य वाचकाच्या कलानंदाची जर आपण थोडी मीमांसा केली तरी या वादावर मार्गदर्शक प्रकाश पडूं शकेल. या बाबतींतील बडेबडे लेखक एकमेकांवर उघड अगर प्रच्छन्न प्रहार करीत असलेले आणि एकमेकांचीं खरींखोटीं वैगुण्यें अहमहमिकेनें दाखवीत असलेले पाहून माझ्या डोळ्यांपुढें एकच दृश्य उभें राहतें. तें म्हणजे दोन प्रतिस्पर्धी नाटक मंडळ्यांचें. दोन्ही मंडळ्यांवर प्रेक्षक खूप असतात अगदीं; पण प्रत्येकीच्या अंतरंगांत जाऊन पहावें तर एकीला दुसरींतील नट भिंती रंगवायच्या सोडून आपले चेहरे रंगवायच्या नादाला उगीच लागले आहेत असें वाटत असतें.

कला, जीवन, तंत्र, शास्त्र, जिव्हाळा इत्यादिकांच्या चक्रव्यूहांत न सांपडलेला मनुष्य काव्य, कथा, नाटकें, कादंबऱ्या इत्यादि वाङ्मय आवडीनें कां वाचीत असतो? उत्तर उघड आहे. आपला वेळ आनंदानें घालविण्याकरितां. हें वाचन तो कांहीं एखादी परीक्षा पास होऊन नोकरी मिळावी या आशेनें करीत नाहीं. ज्ञानलालसा अगर अशाच प्रकारचें कोणतेंही ध्येय त्याच्या मुळाशीं नसतें. त्याला आनंद हवा असतो व तो ज्या पुस्तकापासून ज्या प्रमाणांत मिळतो त्याच्यावर त्या पुस्तकाविषयींचें त्याचें मत अवलंबून असतें. हरीभाऊंची "पण लक्षांत कोण घेतो?" लाखों मराठी स्त्री-पुरुषांनीं वाचली, ती हिंदु स्त्रीवर होणारे अन्याय त्यांना ठाऊक नव्हते म्हणून नव्हे! आणि ज्यांना ते माहित नव्हते त्यांना आगरकरांचे निबंध वाचतां आले नसते असें थोडेंच आहे! देवविषयक ज्ञानाकरितां वामनराव जोशांची "सुशीलेचा देव" कादंबरी वाचण्यापेक्षां उपनिषदापासून पाश्चात्य

तत्त्ववेत्त्यांच्या प्रबंधापर्यंत पसरलेलें वाङ्मय वाचणें अधिक इष्ट आहे हें काय कुणाला सांगायला हवें ? इतिहास कळावा म्हणून ऐतिहासिक कादंबऱ्या वाचणारा अगर सामाजिक परिस्थितीचें ज्ञान व्हावें म्हणून सामाजिक कथा वाचणारा वाचक मुक्त कोटींतलाच मानला पाहिजे. ग्लॅडस्टन-सारखा साम्राज्याचा मुत्सद्दी असो अगर गोविंदरावासारखा म्युनिसि-पालिटींतला कारकून असो, ग्रेटा गार्बोसारखी जगद्विख्यात नटी घ्या अगर खेड्यांत स्वयंपाक करून पोट भरणारी एखादी गोदूबाई घ्या, सर्व माणसें ललित कृतींच्या भक्तांत मोडतात. भक्त कोणत्याही जातीचा असला तरी परमेश्वरप्राप्तीचा प्रत्येकाचा आनंद एकाच स्वरूपाचा असतो. कलेचा अगर ललितवाङ्मयाचा आनंदहि असाच एकरूप आहे यांत संशय नाहीं.

या आनंदांत एक प्रकारची दिव्यता आहे. दुपारीं भुकेच्या वेळीं ओलीकोरडी भाकर खाणारा भिकारी असो अगर पंचपक्वान्नांचा आस्वाद घेणारा धनिक असो, क्षुधाशांतीचा तो आनंद दोघेही लगेच विसरून जातात. ललितवाङ्मयाचा आनंद असा क्षणिक, केवळ शारीरिक अगर व्यावहारिक नसतो. या आनंदाच्या विमानांत बसून आपण वाटेल त्या प्रदेशांत जाऊं शकतों, विविध स्वभावाच्या माणसांशीं समरस होतों, आणि नकळत स्वतःच्या संकुचित व्यक्तित्वाचा विकास करीत असतों. अशा या अलौकिक आनंदाचा उगम भावनांच्या पुनःप्रत्ययांत आहे असें प्रोफेसर फडके म्हणतात. आपल्या आयुष्यांत जीं सुखदुःखें आपण अनुभवलीं असतील त्यांचा अप्रत्यक्ष अनुभव घेणें व देणें हेंच ललित-वाङ्मयाचें मुख्य ध्येय आहे असा त्यांचा सिद्धांत आहे. हृदयस्पर्शित्वा-खेरीज ललितवाङ्मय नाहीं हें कुणीही मान्य करील. पण लेखकानें स्वतः अनुभवलेलीं सुखदुःखेंच तो सांगतो व तेवढेंच वाङ्मय परिणामकारक होतें असें कोण म्हणेल ? रॉबिन्सन क्रूसो लिहिणारा डिफो लहानपणीं घरून पळून गेला होता कीं नाहीं हें मला ठाऊक नाहीं! पण समुद्र कधींही न पाहतां एका निर्जन बेटावर अठ्ठावीस वर्षें राहणारा नायक त्यानें हुबेहूब चित्रित केला. या ठिकाणीं डिफोला कुणीं साहाय्य केलें ? कल्पनेनें कीं अनुभवानें ? सामान्य मनुष्यही आयुष्यांत एक उत्तम

कादंबरी लिहूं शकेल; फक्त त्यानें प्रामाणिकपणानें आपले अनुभव सांगितले पाहिजेत असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. पण याचा अर्थ कादंबऱ्यांचे नायक शोधण्याकरितां राजपुत्र अगर नायिका निवडण्याकरितां अप्सराच धुंडाळल्या पाहिजेत असें नाहीं, एवढाच होऊं शकेल. यावरून प्रत्येक भावनेचा प्रत्यक्ष अनुभव हाच ललितवाङ्मयाचा पाया असतो असें कसें सिद्ध होईल? तसें गृहीत धरलें म्हणजे पुरुष लेखकांनीं केलेलें स्त्रीस्वभावाचें सारें वर्णन इथून तिथून खोटें ठरेल. किंबहुना खलपात्रें उत्कृष्ट रंगविणारा लेखक मोटा सैतान असला पाहिजे असा विचित्र सिद्धांत यांतून निष्पन्न व्हायचा! ललितलेखन हें नुसत्या अनुभवाचें अपत्य नाहीं. आईवांचून जन्माला आलेला एखादा ऋषि पुराणांतरीं असेल. पण ललितकृतीच्या बाबतींत तसें घडणें शक्य नाहीं. अनुभव व कल्पना यांच्या पोटींच तिचा जन्म होतो. इतकेंच नव्हे तर या संसारांत पित्यापेक्षां मातेचेच संस्कार मुलावर अधिक होत असतात.

कल्पनेच्या या प्रभावी शक्तीचा विलास वास्तवतापूर्ण कृतींतहि आढळतो. इब्सेनचें अत्यंत परिचित व परिणामकारक Doll's House हें नाटकच पहा. त्यांतील प्रसंगांपैकीं इब्सेनच्या घरांत कांहींच घडलें नव्हतें, हें प्रथम नमूद करणें जरूर आहे. बायकांना बटणें चांगलीं लावतां येत नाहींत असें इब्सेनचें मत असल्यामुळें तो आपलीं बटणें तुटलीं म्हणजे स्वत:च लावीत असे. यापलीकडे त्या घरांत पतिपत्नीचे मतभेद नव्हते. बायकोनें नवऱ्यावरील उत्कट प्रेमानें एका चेकवर खोटी सही करणें हा त्या नाटकाचा पाया आहे. पण ही गोष्ट तरी इब्सेननें जगांत पाहिली तशीच नाटकांत घातली काय? मुळींच नाहीं. मूळ प्रसंगांत एका बाईनें आपली चैनीची हौस भागविण्याकरितां खोटी सही केली होती. स्त्रीजातीची वकिली करायला हा प्रसंग एखादा सत्यकथावाला सुद्धां निवडणार नाहीं; पण इब्सेनच्या कल्पनेनें त्याचें नायिकेच्या स्वार्थत्यागांत सुंदर रूपांतर केलें. ही स्वार्थत्यागाची पार्श्वभूमि घेऊन स्त्रीजातीवर होणाऱ्या अन्यायाचें चित्र त्यानें मोटया कौशल्यानें रेखाटलें. तें इतकें परिणामकारक झालें आहे कीं, 'No one would sacrifice his honour for the one he

loves ' या नवऱ्याच्या वाक्याला ' It is a thing hundreds of thousands of women have done.' असें नोरा जेव्हां उत्तर देते तेव्हां तिच्या मनाचे कढ व्यवहारी पुरुष वाचकाच्या मनांतहि उसळूं लागतात. इब्सेनच्या कल्पनेचें सामर्थ्य याच ठिकाणीं प्रचीत होतें. नोराचें हें उत्तर सुचायला भिंतीआड लपून शेंकडो नवरा-बायकोंचीं भाडणें इब्सेननें ऐकलीं असतील असें मला वाटत नाहीं. समाजाला स्त्रीजातीची निर्जीव बाहुलीपलीकडे किंमत नाहीं या जाणीवेनें त्याच्या उचंबळून आलेल्या भावनांना कल्पकतेनें या नाटकाच्या द्वारें अत्यंत मोहक रूप दिलें.

याचा अर्थ ललितलेखनांत अनुभवाची अगर अवलोकनाची किंमत कमी आहे असा मात्र मुळींच नाहीं. ललित कृतीचें मंदीर कल्पनेमुळेंच गगनचुंबी होत असलें, तरी त्याचा पाया प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष अनुभवच भरून काढीत असतो. साध्या अनुभवानें कल्पनेला चालना मिळते. अशा कल्पनेच्या विहारांतूनच कलाकृतीला आवश्यक असलेलें सौंदर्य प्राप्त होतें. हिमालयावर आंब्याच्या झाडांची लागवड करणें, आरबी समुद्रांत वाटेल त्या ठिकाणीं मोतीं सांपडतात असें समजणें, अगर मोठ्या माणसाप्रमाणें लहान मुलालाहि कॅन्सर सर्रास होतो असें मानून चालणें या अगर अशाच प्रकारच्या चुका मराठी ललितलेखकांच्या हातून होत असतात. त्या टाळण्याकरितां त्यांनीं अधिक दक्ष होणें आवश्यक आहे. पण हिमालयावर जाऊन आल्याखेरीज त्याचा अवाक्षरानेंही उल्लेख करायचा नाहीं अगर आपल्याला जो रोग झाला नसेल तो आपल्या पात्रांनाही होऊं द्यावयाचा नाहीं, असा निश्चय करून कसें चालेल? ललितलेखकाचें मन अनुभवलेल्या, ऐकलेल्या, वाचलेल्या आणि कल्पिलेल्या सर्व प्रसंगांतील उत्कटतेचे ठसे घेत असतें. त्या त्या प्रसंगानुरूप त्याच्या मनांत भावना जागृत होतात. या जागृत झालेल्या भावनांना क्षुब्ध करण्याचें कार्य कल्पना करते. जलप्रपातापासून वीज निर्माण व्हावी त्याप्रमाणें या क्षुब्ध भावनांतून तेजस्वी ललितकृति निर्माण होत असते.

ललितवाङ्मयाच्या द्वारें पूर्वी अनुभवलेल्या सुखदुःखांचा अप्रत्यक्ष अनुभव येत असल्यामुळें वाचकाला आनंद होतो असें प्रो. फडके म्हणतात.

मृच्छकटिक नाटकांत चारुदत्ताला सुळावर नेतात तेव्हां मुलेंसुद्धां रडतात ! हें दुःख त्यांनीं पूर्वी कुठें अनुभविलेलें असतें ? इब्सेनच्या Enemy of the People मध्यें स्वार्थाला बळी पडलेलीं माणसें सत्यनिष्ठ डॉ. स्टॉकमन-वर भराभर उलटत असलेलीं पाहून आपणांला त्यांचा राग येतो. सत्यसृष्टींत आपण सर्व इतके प्रामाणिक असतों असें कोण म्हणेल ? फार तर इतकी जाज्वल्य सत्यनिष्ठा आपल्या अंगीं असावी अशी आपली इच्छा असेल ! एखादा दारूबाज ' एकच प्याला ' पाहूं लागला तर सुधाकराचें वर्तन त्याला काय क्षम्य वाटेल ? त्या वेळीं मनानें तो सिंधूच्याच बाजूचा असतो. ' गड आला पण सिंह गेला ' ही कादंबरी वाचतांना तानाजीबरो-बर निधड्या छातीनें किल्ला चढणारा वाचक काळोखांत प्रत्यक्ष बाहेर तरी पडत असेल कीं नाहीं कुणाला ठाऊक ! गॉर्कीची "आई" ही कादंबरी वाचतांना कुठल्याही ध्येयापासून दोन हात दूर राहाणारा व्यावहारिक मनुष्य-हि त्या रसप्रवाहांत वाहून जातोच कीं नाहीं ? कोणतीही नवी जुनी नामां-कित ललितकृति घ्या. वाचकाच्या तन्मयतेचा, त्याला होणाऱ्या आनं-दाचा, त्यानें अनुभवलेल्या सुखदुःखाशीं प्रत्यक्ष संबंध असतोच असें नाहीं. भावनांच्या अकारण आविष्कारांत अनिर्वचनीय आनंद असल्यामुळें तो ललितलेखन आवडीनें वाचतो यांत संशय नाहीं. मात्र अतृप्त आशा-आकांक्षांचें समाधान, सुप्त ध्येयवादाची जागृति, व्यावहारिक व्यक्तित्वाचा विसर, इत्यादि अनेक जीवनविकास करणाऱ्या गोष्टी या आनंदाला कारणीभूत होत असतात. ' अहं ब्रह्मास्मि ' हें वेदांतवचन निराळ्या अर्थानें ललितवाङ्मयाच्या वाचकाला लागू पडतें. शकुंतलेच्या वियोगानें कण्वाच्या डोळ्यांत अश्रु आलेले पाहून लहान मूलहि गहिंवरून जातें. याची दुसरी एक उपपत्ति संभवते. कण्वाचें दुःख ज्यानें नुक्तेंच कन्यादान केलें आहे अशा प्रौढ पित्याला जाणवणें स्वाभाविक आहे. पण आठ दहा वर्षांच्या मुलानें अशा वेळीं कां रडावें ? हा वियोग प्रसंग पाहून त्याच्या अंतर्मनांतील अगदीं साधा ताटातुटीचा अनुभव—एक दिवस आई गांवाला गेली असतांना आपण किती रडलों ही आठवण—त्याला समोरील दृश्याशीं समरस होण्याला समर्थ करीत असेल.

ललितवाङ्मयापासून आनंद होतो व झाला पाहिजे हें प्रो. फडके यांच्या प्रमाणें सर्वांनाच मान्य असल्यामुळें त्या आनंदाच्या मीमांसेबद्दलचे मतभेद मी तरी महत्त्वाचे मानले नसते. पण साळसूद तात्त्विक प्रमाणांच्या पोटीं तर्कदुष्ट अनुमानें जन्माला येतात. अनुभवाचें प्रमाण मांडून प्रो. फडके पुढें सुचवितात कीं गिरणीकामगाराच्या खांद्याला खांदा लावून घाम गाळल्या-खेरीज साम्यवादी वाङ्मय निर्माण करणें अगर वेश्यांच्या घरांतील वातावर-णाचा परिचय असल्यावांचून त्यांचीं चित्रें रेखाटणें हें कृत्रिम वाङ्मय होय. हरिभाऊंच्या पहिल्याच कादंबरींतील वेश्येच्या गृहाचें वर्णन वाचून त्यांच्या वडील मंडळींना भलताच संशय आला होता, हें फडके अशा वेळीं सोई-स्करपणें विसरतात. परिचित वातावरणाचें चित्रहि कृत्रिम रीतीनें काढणारे लेखक काय थोडे असतात? शिवाय कृत्रिमअकृत्रिम ठरवायला कस कोणता? मानवी स्वभाव कीं टीकाकाराचा वैयक्तिक अनुभव? कोंकणांत अजून शारदा कायद्याचा पत्ताहि नसावा अशी मुंबईत बसून कल्पना करून घेणाऱ्या एका टीकाकारानें माझ्या कादंबरींत एक मुलगी वीसबावीस वर्षां-पर्यंत कुमारी राहिलेली पाहून या कृत्रिमपणाबद्दल माझ्यावर गहजब केला होता. बिचाऱ्याला ठाऊकहि नाहीं कीं कोंकणांतील खेड्यांत सुद्धां प्रौढ कुमारीचा प्रश्न दत्त म्हणून लोकांपुढें कधींच उभा राहिला आहे!

हें अनुभवप्रकरण संपविण्यापूर्वी एकदोन महत्त्वाच्या गोष्टींचा ओझ-रता उल्लेख करणें जरूर आहे. आपले सर्व अनुभव कशाचीहि भीति न ठेवतां व्यक्त करण्याचा प्रामाणिकपणा ललितलेखक दाखवितात काय? केवळ सत्यकथनाकरितां जन्माला आलेल्या आत्मचरित्रांत सुद्धां विलक्षण लपंडाव आढळतात. महात्माजींनीं आपल्या आत्मचरित्राला सत्याचे प्रयोग असें नांव दिलें तें उगीच नाहीं. प्रयोग निराळे आणि शोध निराळा! ललितलेखक हा साधुपुरुष नसल्यामुळें असले प्रयोग करीत बसण्यांत तो आपला वेळ थोडाच खर्च करणार आहे! मराठी ललित वाङ्मयांतील अनुभवसिद्ध लेखकांनीं केलेलें प्रणयाचेंच चित्रण पाहावें आकस्मिक योगायोगांनीं तरुण स्त्रीपुरुष एकत्रित येतात, त्यांचें एक क्षणांत एकमेकांवर प्रेम बसतें, आणि अनेक आपत्ति येऊनही ते अढळ

राहतें, इत्यादि अनुभवांत किती टक्के खरेपणा आहे तें सध्यांची तरुण मंडळीच माझ्यापेक्षां अधिक मोकळेपणानें सांगूं शकतील.

ललितवाङ्मयकृति ही बोलून चालून सत्याभासावर उभारलेली! आपल्या वैयक्तिक चरित्रांवर चंचुप्रहार करण्याची संधि काकदृष्टि टीकाकारांना मिळूं नये म्हणून कोणी वैयक्तिक अनुभवांना मुरड घालतो तर कलेच्या दृष्टीनें कोणी आपल्या अनुभवांत बदल करतो. अर्थात् अशा विविध संस्कार झालेल्या कलाकृतींतील अनुभवांना पूर्ण सत्य म्हणणें म्हणजे आईस्क्रीम हें मूळचें गंगाजळ आहे असें समजून त्याची पूजा करण्यासारखेंच नाहीं काय? ब्राऊनिंगच्या Incident of the French Camp या छोट्या नाट्य-गीतांतला बाल नायक प्रत्यक्ष प्रसंगांत प्रौढ होता. पण रसोत्कर्षासाठीं कवीनें त्याला एकदम लहान केलें! ललित-लेखक अगदीं आत्मनिवेदन करण्याच्या भरांत आला तरी त्या निवेदनाचें स्वरूप बहुधा समर्थनानेंच होतें. टॉलस्टॉयसारख्या कठोरतेनें आत्मपरीक्षण करणाऱ्या लेखकालाहि या आत्मसमर्थनाच्या मोहजालांतून पूर्णपणें मुक्त होतां आलें नाहीं हें या बाबतींत लक्षांत ठेवण्याजोगें आहे.

अर्थात् अनुभवाचें महत्त्व भावनेला चालना मिळण्याच्या दृष्टीनें मानलेंच पाहिजे. मात्र प्रो. फडके, भावनाजागृतीचा सिद्धांत मान्य करूनहि आनंदापेक्षां पलीकडे या जागृतीचें कार्य नाहीं असें सांगतात! परंतु उचंबळून आलेल्या भावनांचे संस्कार वाचकांच्या मनावर कांहींच परिणाम घडवीत नाहींत का? ललितवाङ्मय अजून प्रयोगशाळेंत—शास्त्रज्ञांच्या हातांत—गेलेलें नाहीं. पण उद्यां दोन मुग्ध मुलें घेऊन एक वर्ष त्यापैकीं एकाला नुसत्या प्रणयकथांचीं पारायणें करायला लावलीं, आणि दुसऱ्याला करुणकथांच्या पुरांतून बाहेर येऊं दिलें नाहीं तर त्यांच्या मनोवृत्तींत कांहींच बदल दिसून येणार नाहीं का? देशभक्तिपर कादंबरी वाचल्याबरोबर प्रत्येक मनुष्य देशभक्त बनतो, असें नाहीं. तसें असतें तर अवाढव्य लष्करी खर्च करण्यापेक्षां हुकमेहुकूम राष्ट्रीय लिखाण करणारे पांचपंचवीस कादंबरीकारच प्रत्येक राष्ट्रानें आपल्या पदरीं बाळगले असते. पण अशी कादंबरी वाचतांना ज्या भावनांची तार छेडली

जाते त्या आपोआप अधिक सजीव व संस्कारक्षम होतात. खेळण्यानेंच लहान मुलांचा विकास होत नाहीं काय ? अशा सुसंस्कृत भावना व्यक्तिशः दुर्बळ असतात. पण त्यांचें सामुदायिक स्वरूप मात्र प्रसंगीं अत्यंत प्रभावी होतें. तसें पाहिलें तर समुद्राची एकएक लाट खडकावर आपटून फुटून जाते. पण अगणित लाटांचे क्षणोक्षणीं होणारे आघात शेवटीं त्या खडकाचा चक्काचूर करतात. समाजाच्या भावना जागृत करून ललितवाङ्मय प्रगतीला पोषक अशी पार्श्वभूमि निर्माण करतें ती याच पद्धतीनें. पुनर्विवाहावरील नाटक रात्रीं पाहिलें कीं दुसरे दिवशीं सकाळीं झाडून सारे प्रेक्षक आपल्या घरांतील विधवांच्या पुनर्विवाहाचे मुहूर्त शोधूं लागतील, मजुरांच्या दुःस्थितीचें चित्र रेखाटणारी कादंबरी वाचतांच एकूणएक वाचक आपल्या घरांतील मोलकरणींचे पगार दामदुप्पट करतील, अगर हरिजनांवरील अन्यायाचें करुणचित्र दाखविणारी कविता ऐकतांच काव्यगायन थांबवून सारे श्रोते एकदम त्याचें परिमार्जन करण्याकरितां महारवाड्याकडे धांवून जातील अशी वेडा मनुष्य सुद्धां कल्पना करणार नाहीं. पण एका पिढीला मानवजातीची प्रगति स्पष्ट दिसत नाहीं म्हणून गेल्या पांच हजार वर्षांत ती मुळींच झाली नाहीं असें म्हणणें कितीसें प्रामाणिकपणाचें होईल? ललितवाङ्मयापासून होणाऱ्या भावनाजागृतीलाहि हाच नियम लागू आहे.

ललितलेखन व समाजजीवन यांचा असा संबंध कुणी दाखवूं लागला कीं अनेक कलावंत एकदम कावरेबावरे होतात. त्यांना वाटतें, या सिद्धांताची पुढील पायरी म्हणजे कुणी काय लिहावें याविषयीं निघणारीं फर्मानें होत.

पण फडक्यांच्या लिखाणांत प्रणय अगर अत्र्यांच्या लेखनांत विनोद येतां कामा नये असा वटहुकूम काढण्याइतका समाज अरसिक का आहे ? त्याची मागणी ललितलेखकानें शक्य तर मार्गदर्शक व्हावें, निदान प्रगतिपथावरील पर्वतप्राय अडचणींशीं टक्कर देत पुढें जाणाऱ्या मानवजातीला सोबत करावी एवढीच असते. यांत गैरशिस्त असें काय आहे ? सती जाणाऱ्या स्त्रीचें चित्र आदर्श म्हणून रेखाटण्यांत एके काळीं लेखकांना धन्यता वाटली असेल. आज नालायक नवऱ्याची शृंखला खळकन् तोडून

टाकणाऱ्या कर्तृत्वशाली स्त्रीचें आपण कौतुक करूं. आजचा कवि मराठेशाहींत जन्मला असता तर त्यानें गो–ब्राह्मण–प्रतिपालक शिवाजीवरच पोवाडे रचले असते; साम्यवादावर खास नाहीं. पण तेवढ्यामुळें आजच्या आपल्याभोंवतालच्या परिस्थितीकडे त्यानें पाठ फिरविणें कांहीं समर्थनीय ठरत नाहीं. ललितलेखकाची व्यक्तिमत्ता त्याच्या काळाहून व्यापक असावी एवढीच काय ती समाजाची अपेक्षा असते.

ललितवाङ्मयाच्या आनंदाचा उगम भावनाजागृतींत असला तरी त्यापलीकडे त्याचें कार्य नाहीं हें म्हणणें तरी निर्दोष आहे काय? मनुष्य हा हंसणारा प्राणी असूनहि करुणरसापासून त्याला उदात्त आनंद होतो तो उगीचच का? या उत्कट सहानुभूतीचा बुद्धीशीं कांहींच संबंध नसतो असें कोण म्हणेल? त्या त्या क्षणापुरता रसिक वाचक ललितकृतींतील रसाशीं जगदीं तद्रूप होऊन जातो. सीतात्याग करणाऱ्या रामाची कानउघाडणी करावी अगर सिंधूला काठीनें बडविणाऱ्या सुधाकराचा हात धरून ठेवावा असा विचार त्याच्या मनांत तो प्रसंग पाहतांना येत नाहीं काय? ललितवाङ्मय वाचतांना सत्य, सौंदर्य, न्याय इत्यादिकांच्या बाजूनें नकळत प्रत्येक वाचक लढत असतो. जों जों कथा त्याच्या निकट अनुभवांतली, तों तों त्याच्या या लढाऊ वृत्तीचें स्वरूप अधिक स्पष्ट! शकाराच्या हातीं सांपडलेल्या वसंतसेनेपेक्षां शंकरमामंजींच्या कारवाईला बळी पडलेली यमुना त्याला अधिक विचार करायला लावते. समाजाच्या प्रगतीला ललितवाङ्मय प्रेरक होतें तें या दृष्टीनेंच.

प्रेरणा करण्याचें हें सामर्थ्य ललितलेखनांत असायला लेखकाचा दृष्टिकोन व्यापक, वास्तव व प्रगतिपर हवा. व्यक्ति या नात्यानें लेखकाच्या आवडीनिवडी संकुचित असतील. पण तेवढें व्यक्तित्व–मग तें कितीहि सौंदर्यानें नटलेलें असो–प्रभावी लेखनाला पुरें पडत नाहीं. कॉलेजांतील युव-युवतींच्या प्रणयकथा आपल्या मनाच्या रंगानें चित्रित करतांना 'पुढें काय?' हा त्यांतील शेंकडा नव्वदांपुढें उभा राहिलेला राक्षसी प्रश्न कथालेखकाला दिसायला नको काय? मध्यम वर्गांतील युवतींचीं आनंदीआनंदानें भरलेलीं वर्णनें करतांना प्रेम विवाह, आर्थिक स्वातंत्र्य, कुमारिकेचें मातृपद

इत्यादिकांच्या चक्रव्यूहांत सांपडून भांबावून गेलेल्या त्यांच्या मनाशीं कादं-बरीकारानें समरस व्हायला नको का? गोरगरिबांविषयीं सहानुभूति दाखवि-णारीं चार वाक्यें लिहून जीवनाच्या या सर्वांत मोठ्या अंगाची संभावना करणारा लेखक शरीरानें नव्या युगांत असला तरी मनानें जुन्या युगांतच वावरत असतो. आपल्या घरट्याच्या आसपास फिरत राहणाऱ्या पांखराला दूरदूरचीं गोड फळें खायला कधींच मिळत नाहींत! दूर जाण्याचें धाडस करणाऱ्या पांखरांपैकीं कांहीं पारध्यांच्या गोळ्यांना बळी पडत असतील. पण तेवढ्यामुळें जागच्या जागीं पंख हलवीत बसणाऱ्या पांखरांची कुणी झालें तरी कींवच करील.

ललितलेखकानें आपल्या अनुभवाचें व कल्पनेचें क्षेत्र वाढविलें कीं त्याचें वाङ्मय सहजच वास्तववादी होतें. त्याच्या डोळ्यांवरील व्यक्ति-त्वाचा चष्मा दूर होऊन तिथें सामाजिक दुर्बीण येते. कोणत्याही देशाच्या सध्यांच्या वाङ्मयाकडे पाहिलें तरी वास्तवाचा विविध विलासच तिथें दृष्टीस पडेल. पूर्वपरंपरा, सामाजिक परिस्थिति, आणि संकुचित कार्यक्षेत्र यामुळें आपल्याकडील साहित्यांत अजून वास्तवाला यावें तितकें महत्त्व आलेलें नाहीं. किंबहुना त्याविषयींच्या कल्पना बऱ्याच संदिग्ध आहेत. 'घराबाहेर' नाटकांतील निर्मला गृहत्याग करतांना गळ्यांतील मंगळसूत्र तोडून निघून जाते, ही गोष्ट वास्तव नाहीं असें कांहीं टीकाकारांचें म्हणणें आहे. समाजांतील शेंकडा ऐंशी टक्के लोक जी गोष्ट करीत असतील तीच त्यांच्या मतानें वास्तव ठरूं शकेल. हा नियम मान्य केल्यास सकाळीं चहा पिणें, दुपारीं जेवणें, रात्रीं झोंपणें (घोरत असें म्हणत नाहीं. कारण शेंकडा ऐंशी टक्के लोक घोरतात असें आंकडेवारीनें कुणीच सिद्ध केलेलें नाहीं. इत्यादि कृती ज्यांच्यांत आहेत त्या ललितकृतीच काय त्या वास्तव ठरतील; आणि असलें ललित वाङ्मय लिहायला निसर्ग, समाज, कला इत्यादिकांची उपासना करण्याचें प्रयोजन तरी काय आहे? खानेसुमारीचा अहवाल त्यांच्यापेक्षां अधिक स्फूर्तिदायक ठरायचा! कौन्सिलांतील जागांप्रमाणें लोकसंख्येच्या प्रमाणावर वास्तवता अवलंबून असते, ही कल्पना अगदीं हास्यास्पद नाहीं का? कंटाळलेली, गांजलेली, चिडलेली निर्मला क्षुब्ध मनःस्थितींत मंगळसूत्र तोडूं शकेल कीं नाहीं, एवढेंच प्रेक्षकांनीं पहावयाचें

असतें. किंबहुना दहा वर्षे कोंडमारा झालेल्या तिच्या मनाचा स्फोट नाटककाराला दुसऱ्या कोणत्या कृतीनें अधिक सुंदर रीतीनें प्रगट करतां आला असता ? ललितकृतींत जीवनांतल्या उत्कट प्रसंगांचीं प्रतिबिंबें अल्पकाळांत, थोड्याशा पृष्ठांत सजीव करून दाखवावयाचीं असतात. व्यवहारांतील वास्तवता ही पिण्याच्या औषधाप्रमाणें मानली, तर वाङ्मयांतील वास्तवता ही टोंचून घालायच्या औषधाप्रमाणें आहे. त्या औषधांचे गुणधर्म एक असले तरी त्यांचें स्वरूप भिन्न असणेंच स्वाभाविक नाहीं का ?

वास्तवतेचा आत्मा स्वाभाविकता हा आहे. विशिष्ट परिस्थितींतील विशिष्ट मनुष्याचें वर्तन वाचकाला पूर्णपणें सुसंगत वाटलें कीं, वास्तवाची कसोटी संपली. या दृष्टीनें पाहिलें तर वास्तवतेचा खरा विरोध अद्भुतरम्यता व कृत्रिमता यांच्याशीं आहे. व्यक्तीच्या बाल्याप्रमाणें मानवजातीच्या बाल्यावस्थेंत अद्भुतरम्यतेचा पगडा मानवी मनावर अधिक असावा, यांत अस्वाभाविक असें काय आहे ? पण श्री. न. चिं. केळकर यांच्यांसारखे साहित्याचार्यही रसोत्कर्षाला अद्भुतरम्यता परिपोषक होते असें प्रतिपादन करतात तेव्हां हें विधान विलक्षण वाटतें. ते म्हणतात, ' बाबू चित्तरंजन दास यासारख्या गृहस्थानें मेल्या गेल्या बापाचें सर्व कर्ज फेडलें असें ऐकलें तर आपणाला विशेष आश्चर्य वाटेल. लौकिक इनामदारीची मजल प्रायः इथें संपेल. पण स्वप्नांत एखाद्या याचकाच्या हातावर उदक सोडलें तर तें खरें करणारा हरिश्चंद्र लौकिक युगांत कुठें भेटणार ? त्याकरितां अदृश्य, अलौकिक अशा काल्पनिक जगाकडेच गेलें पाहिजे. हरिश्चंद्राच्या या उदाहरणावरून भावना जितकी प्रदीप्त होते व जितका रसोत्कर्ष होतो, तितका लौकिकांतलें वचनपरिपालन पाहून होणें शक्य नाहीं. अतिथि—सत्कार लौकिक जगांत होत असतोच; पण श्रियाळ व चांगुणा यांनीं स्वतःच मुलगा मारून व रांधून अतिथीला वाढला तशी गोष्ट लौकिक जगांत कोठून आढळणार ? अर्थात् अतिथिधर्माचें परमोच्च स्वरूप रंगवावयाचें तर पुराणाकडेच वळलें पाहिजे' ! खरोखर या दोन्ही कथा आजच्या वाचक—प्रेक्षकांच्या मनाला मानवी वाटतात काय ? भोंवतालच्या खऱ्याखुऱ्या जगाहून अत्यंत भिन्न असलेल्या जगांत मौजेखातर मनुष्याचें मन रमूं शकेल. पण त्यांतील माणसें त्याला

हाडामांसाचीं वाटणें शक्य नाहीं. अतिथीकरतां मुलाची हत्त्या करून त्याला उखळांत कांडणारी आई आजच्या प्रेक्षकाला राक्षसीण वाटली तर त्यांत नवल नाहीं. कदाचित् हा मान तिच्या दारांत धरणें धरून बसणाऱ्या देवाकडेही जाईल ! अत्यंत आधुनिक पद्धतीनें स्वप्नांची मीमांसा होत असलेल्या या काळांत स्वप्नांत राज्यदान करणारा हरिश्चंद्र खरा भासला, तरच त्याच्या त्या अलौकिक त्यागाचा मनावर पुढें परिणाम होणार ! मृगजलाचें दृश्य सुंदर दिसतें यांत वाद नाहीं. पण तें पाहून हरिणें धांवूं लागतात. माणसें फार-तर तें गंमतीनें पाहतात. हरिश्चंद्राच्या या अलौकिक त्यागाचा शेवटही अलौकिकच होतो ! तारामतीचा वध करण्याला हरिश्चंद्रानें तलवार उगारली असतांना शंकर एकदम प्रगट होऊन त्याचा हात धरतात ! लक्षावधि लोकांचा बळी घेणारें महायुद्ध थांबविण्याकरितांसुद्धां ज्यानें अवतार घेतला नाहीं, कोट्यावधि निरपराधी दीनदुबळ्यांच्या किंकाळ्या कानांवर पडूनहि ज्याची झोपमोड होत नाहीं, त्या देवाच्या अवतारावर आतां पुराणाला जाणाऱ्या आजीबाईखेरीज दुसऱ्या कुणाचा विश्वास बसणार ? रसोत्कर्षाला अलौकिकत्व लागतें हें खरें. पण अलौकिकत्व म्हणजे दैवी चमत्कार नव्हे; लौकिकांकडे अलौकिकत्व प्रगट करून दाखविणें हेंच वास्तववादी वाङ्मयाचें खरें कार्य आहे. आजच्या मानवी मनाशीं त्याचाच संवाद होऊं शकेल.

वास्तववादी वाङ्मयावरील या आक्षेपाचा अनेक दिशांनीं विस्तार कर-ण्यांत येतो. ललितकृतींतील सामान्य मनुष्याचीं सुखदुःखें वाचकाला खरोखरच उत्कट वाटतात काय ? बायका काय हल्लींच पळविल्या जातात असें नाहीं. पण सीताहरणाच्या प्रसंगांतलें कारुण्य मुंबईतल्या चाळींत रहाणाऱ्या एका रामभाऊची सीताबाई नांवाची बायको कुणीं पळविली तर उत्पन्न होईल काय ? या नाहीं त्या कारणानें अज्ञातवासांत राहण्याची पाळी आलेलीं अनेक तेजस्वी माणसें आपण पाहतों. पण गदाधारी भीम विरा-टाच्या घरीं पोळ्या लाटीत आहे आणि द्रौपदीला दासीचीं कामें करावीं लागत आहेत, हें पाहून आपलें मन जेवढें गहिंवरून जातें, तेवढें सध्य अज्ञातवासांत दिवस काढणाऱ्या माणसांच्या हकीगतींनीं तें हेलावतें काय ? मद्यपानाच्यापायीं राक्षस-पक्षासह धुळीला मिळालेला शुक्राचार्य दारूच्या

पेल्यांत तीन माणसांचें कुटुंब बुडविणाऱ्या सुधाकरांपेक्षां अधिक परिणामकारक वाटत नाहीं का ?

प्रमुख भूमिकांभोवतीं विभूतिमत्वाचें वलय असल्यावांचून ललितकृतीला परिणामकारकता येत नाहीं असा या प्रश्नांचा निष्कर्ष वाटतो. पण भव्यता, अलौकिकता, विभूतिमत्व वगैरेविषयींच्या आपल्या आजच्या कल्पना पुढें अशाच राहतील म्हणून काय नेम आहे ? नाटकांचा नायक राजाच असला पाहिजे असा जवळजवळ संस्कृतमध्यें दंडकच नव्हता का ? पण या संकुचित कल्पनेपलीकडे जाऊन चारुदत्ताला नायक करणारा शूद्रक यशस्वी झालाच कीं नाहीं ? पूर्वींच्या नायकनायिकांना असणारें विभूतिमत्त्व आजच्या सामान्य भूमिकांना नाहीं हें खरें. पण या भूमिकांच्या द्वारें वैयक्तिक सुखदुःखापेक्षां सामाजिक सुखदुःखें चित्रित केलीं जातात, हा त्यांचा विशेष आहे. व्यक्तिविषयक अलौकिकत्वाची उणीव सामाजिक भव्यतेला भरून काढणें अशक्य नाहीं. गॅल्सवर्दीच्या Silver Box मधला नायक कोण आहे ? एका यःकश्चित् मोलकरणीचा दारूबाज नवरा ! पण त्याच्याविषयीं वाचकाच्या मनांत जी सहानुभूति उत्पन्न होते, ती तो तशाच प्रकारच्या परिस्थितींत सांपडलेल्या दलितांचा प्रतिनिधि वाटतो म्हणून. सामाजिक कथेंत उत्कटतेचें शिखर गांठण्याला सामान्य भूमिकेच्या मागें अदृश्य समाज हवा यांत मात्र शंका नाहीं.

वाङ्मय वास्तववादी झालें कीं भाषेनें सर्व अलंकारांचा त्याग केलाच पाहिजे, अशीहि अनेकांची कल्पना झालेली आढळते. कित्येक ठिकाणीं तर 'बंधुभगिनींनो' हा शब्द फार कठीण दिसल्यामुळें त्याचें 'भावाबहिणीनों' असें रूपांतर करण्यापर्यंत भाषेच्या साधेपणाची मजल जात आहे. टांगेवाल्याला टांगा अग्निरथ-विश्राम-स्थानाकडे न्यायला सांगणारे अगर बाजारांत वाण्याकडे जाऊन तण्डूल व गोधूम मागणारे शब्दपंडित कुठें हयात असलेच, तर गाडी चुकून व अन्न न मिळून त्यांना योग्य शिक्षा आपोआपच होत असेल. परंतु प्रसाद हा भाषेचा मोठा गुण असला तरी प्रसाद म्हणजे भाषासर्वस्व नव्हे किंवा भाषासौंदर्यहि नव्हे ! 'हिरवे हिरवे गार गालिचे । हरित तृणाच्या मखमालीचे ।' या बालकवीच्या ओळी

असंस्कृत वाचकांना समजाव्यात म्हणून 'हिरवे हिरवे गार गालिचे। हिरव्या गवती मखमालीचे।' असें त्याचें रूपांतर करावयाचें कीं काय? व्यवहारांत अगर मतप्रचारांत शक्य तेवढी सुबोध भाषा वापरण्याकडे प्रत्येकाचा कटाक्ष असतो व असावा. प्रश्न आहे तो ललितवाङ्मयाचा. सुंदर मंदिराचे दगडसुद्धां काळजीपूर्वक निवडिलेले असतात. ललितकृतींत शब्दांचें असेंच महत्व आहे. नादमधुर, अर्थवाहक, आणि आत्मविशिष्ट भाषाशैली ललितलेखकानें मोठ्या कष्टानें कमावलेली असते. ती भाषा लहान मुलांना अगर अशिक्षितांना पूर्णपणें कळत नसली म्हणून तिचें महत्त्व साहित्यदृष्ट्या कमी होत नाहीं.

मात्र यामुळें कृत्रिम अलंकारप्रचुर रचनेचा सर्रास परवाना मिळतो असें कुणीच मानण्याचें कारण नाहीं. अलंकारांचा अतिरेक सौंदर्यांत भर न घालता त्याची हानिच करतो. युवतीच्या केशकलापाला फुलानीं शोभा येते हें खरें; पण तें एका मर्यादेपर्यंतच. फुलांनीं तिच्या मस्तकाचा केंस-भरही भाग जर दिसेनासा झाला तर या दृश्यानें आपल्याला हंसूं आल्या-वांचून राहणार नाहीं. परवांच कुठल्याश्या वर्तमानपत्रांत हें वृत्त वाचलें— "उकाड्यामुळें आपल्या लाडक्यांच्या होणाऱ्या तळमळीकडे पाहून भूमातेच्या शोकाला भरती येऊन गेल्या रविवारीं तिनें अश्रुमोचन केल्यानें सर्वांना जरा हायसें वाटलें." या वृत्तानें प्रथम मी स्तंभितच झालों. नंतर माझ्या लक्षांत आलें कीं लेखकाला पाऊस पडला असें सांगायचें आहे. अलं-कारिक भाषेंतील अलंकार सोनारानें घडवावे लागतात. तें काम लोहाराच्या-कडे गेलें म्हणजे अशी भयंकर कलाकुसर व्हायचीच! यापुढेंच बातमी होती "जन्मसंख्या संततिनियमाच्या ओरडीला न जुमानतां वाढत्या प्रमा-णांत असून तिच्यापुढें यमराजानाही हात टेंकावे लागले आहेत." आच-रट विनोदाकरतां लहान मुलांच्या मुळावर आलेले असले लेखक क्वचित्‌च आढळतात ही भाग्याची गोष्ट आहे! अलंकारांच्या बाबतींत इतकेंच म्हणतां येईल कीं बाणभट्ट व मोरोपंत यांचें युग मागें पडलें हें लेखकानें विसरूं नये. पण इब्सेन व स्टीफेन झ्वाइग याच्या या युगांतही ते रूपांतर पाऊन चमकल्यावाचून राहात नाहींत. सूचकता, प्रतीकें, वाता-वरण इत्यादि पाश्चात्य वाङ्मयांतील अगदीं आधुनिक गोष्टी हे नवीन

पद्धतीचे अलंकारच नाहींत कां ? हार्डी व ओ. हेन्री यांची भाषा अनेकदां अलंकारिक असल्यामुळेंच लेखकाचें सामर्थ्य व वैशिष्ट्य प्रगट करूं शकते हा अनुभव कुणा तरुणाला नाहीं ?

सुबोधपणा हा भाषाशुद्धीचा एक प्रकार झाला. तिचें दुसऱ्या दृष्टीनें शुद्धीकरण करण्याकरितां सध्यां एक मोठा यज्ञ सुरू झाला असून त्यांतील प्रमुख ऋत्विज बॅ. सावरकर व प्रो. माधवराव पटवर्धन हे आहेत. सी. आय. डी. तील मनुष्याच्या नजरेनें ते मराठींत वापरला जाणारा प्रत्येक शब्द पाहतात आणि तो फारशी अगर इंग्रजी असल्यास लगेच त्याला हद्दपार करतात. या हाकलून दिलेल्या शब्दांची जागा भरण्याचें काम संस्कृत कोश व लेखकाची कल्पनाशक्ति या दांपत्याकडे सामान्यतः देण्यांत येतें. सावरकर–पटवर्धनांची तक्रार एका दृष्टीनें रास्त आहे. खेडेगांवांतील लुगडीं विकणारा फेरीवाला देखील 'नवीन डिझाईन, नवीन पेंटर्न' म्हणून ओरडत असतो. भिक्षुकसुद्धां आपलें मत सांगतांना म्हणतो, 'माझा पैंट ( Point ) असा आहे!' इंग्रजीनें मराठीच्या ओसरीवरच नव्हे, तर माजघरांतसुद्धां यथास्थित पाय पसरले आहेत. तिच्या लाथा खात खातच मराठी आपल्या घरांत जीव मुठींत घेऊन वावरत आहे, हें सुशिक्षितांच्या साध्या संभाषणावरून देखील दिसून येईल. शिकलेल्या लोकांचें इंग्रजीमिश्रित मराठी उपहारगृहांतील मिसळीसारखें वाटतें! कोणत्या वेळेला कसला तुकडा मिळेल याचा नेम नाहीं. फारशी शब्दांचा प्रश्न तर त्यापेक्षांहि बिकट आहे. आपण वापरतों तो शब्द फारशी आहे असें ठाऊक असलें तर पुढें त्याचें उच्चाटन करायचें कीं काय हा विचार व्हायचा! रस्त्यांत 'दोस्त' दिसो, अगर 'दुश्मन' दिसो, 'दवाखान्यांत' जाण्याचा प्रसंग येवो अगर 'फरासखान्यांत' जाण्याची पाळी येवो, 'दस्तऐवजा'चें काम असो, नाहींतर 'खानेसुमारीचें' काम असो, सर्व ठिकाणीं फारशी शब्दांचा आपण एकजात आश्रय करीत असतों.

या परदेशीय पाहुण्यांचें कोशांतून उच्चाटन करण्याचें कार्य इष्ट आहे, असें क्षणभर गृहीत धरलें तरी तें सर्वस्वीं शक्य आहे काय ? परक्या भाषे-

तील एकूणएक शब्दांवर बहिष्कार घालण्याचें धोरण भाषावृद्धीच्या दृष्टीनेंही हिताचें नाहीं. आपणांला परकीय सत्तेचें राज्य नको असतें, पण परदेशाशीं व्यापार नको असें कोण म्हणेल? दोन भाषांचा संबंधहि असाच नाहीं का? पांढरा केंस दिसला कीं तो चिमट्यानें उपटून टाकून चिरकाल तरुण राहूं इच्छिणाऱ्या माणसाला आपल्या प्रयत्नांत जेवढें यश येईल, तेवढेंच यश शतकानुशतकें व्यवहारांत रुळलेले फार्शी शब्द आणि दोन तीन पिढ्या मराठीच्या अंतर्गृहांत वावरणारे इंग्रजी शब्द हुसकून लावणारांच्या पदरीं पडेल. रक्तशुद्धिप्रमाणें भाषाशुद्धीच्या अभिनिवेशालाहि मानवी व्यवहारापुढें अनेक वेळां मान खालीं घालावी लागते हें विसरून चालणार नाहीं.

अभिनिवेश हें कोणत्याहि वादाचें एक टोंक असतें. अभिमानशून्यता हें त्याचें दुसरें टोंक! "आव जाव घर तुमारा" अशी मराठीची—निदान संभाषणांत तरी—आजची स्थिति आहे. इंग्रजींत ज्याला अमुक म्हणतात तें असें सांगण्याची पाळी चांगल्या विद्वान् वक्त्यावर यावी हें लाजिरवाणें नाहीं काय? सामान्य माणसाची गोष्ट सोडाच, पण अनेक साहित्यिकांनाहि इंग्रजींतील पत्रव्यवहाराचा मोह अजून आवरत नाहीं. मातृभाषेच्या भक्तीच्या ज्योतीवर धरलेली ही काळजी झाडण्याचें काम सावरकर पटवर्धनांच्या अभिनिवेशानें होण्याचा संभव आहे. मात्र विविध अर्थच्छटा असलेले व पूर्णपणें भाषेच्या पचनीं पडलेले जुने परकी शब्द आणि जगाच्या वाढत्या व्यवहारामुळें अर्थवाहक म्हणून घ्यावे लागणारे नवे परकी शब्द, यांच्यांवर सरांस कुऱ्हाड चालविण्यांत आपलें शक्तिसर्वस्व त्यांनीं खर्च करूं नये. मनोरंजनांत येणाऱ्या स्वयंपाक—घरांतील गोष्टीवरून स्फूर्ति मिळून गडकऱ्यांनीं जशी विविध विनोदी पक्वान्नें तयार केलीं, त्याप्रमाणें 'रेकॉर्ड' सारख्या शब्दाच्या शुद्धी—करणाचा विधि पाहून आजच्या विनोदी लेखकांची प्रतिभाहि जागृत होऊं शकेल. नवीन शब्दांची टांकसाळ प्रत्येक भाषेंत असावीच—स्वत्व विसरलेल्या मराठीला तर ती अवश्य हवी; मात्र त्यांत निष्क, मोहरा, शिवराई, वगैरे प्राचीन पद्धतीचीं नाणींच पाडण्याचा अट्टाहास असूं नये. योग्य असेल तो टिकेल, हा जीवशास्त्राचा सिद्धांत नवीन शब्दांनाहि लागू पडतोच पडतो.

भाषाशुद्धीच्या अभिमानाला सोंवळेपणामुळें जसें कित्येकदां हास्यास्पद स्वरूप येतें, तसें ललितवाङ्मयाच्या टीकेलाही येऊं शकतें. अग्निहोत्रमंदिरांत आधुनिक वाङ्मयाची चर्चा झाली तर ती गोष्ट अत्यंत इष्टच आहे. पेन्शनरांच्या क्लबांत क्रिकेटवर वादविवाद झाले म्हणून बाळगोपाळांना त्याचें दुःख कां व्हावें? मात्र असल्या वाङ्मयचर्चेला व्यापक, सामाजिक व साहित्यविषयक अधिष्ठान हवें. अनीति, अश्लीलता, पावित्र्यविडंबन इत्यादींचीं आपल्याच मनांत तयार झालेलीं शास्त्रीय उपकरणें घेऊन ललितकृतींतील एखाद्या भागाची चिरफाड करणें म्हणजे टीका नव्हे. ललितलेखकाला नीति नको असते अगर पावित्र्याची पर्वा नसते असें थोडेंच आहे! पण संक्रमणकाळांत मानवतेची नीति परंपरागत नीतीपेक्षां निःसंशय निराळी होते. ललितलेखकाची जात मानवता, धर्म माणुसकी! त्यांचीं बंधनें त्याला पाळावींच लागतात! श्रुति–स्मृति–पुराणोक्त नीतीच्या चौकटींत बसण्याइतकीं त्याचीं समाजचित्रें निर्जीव नसतात हा काय त्याचा दोष म्हणायचा? वास्तवता व ध्येयवाद यांच्या मीलनांत ललितकृति जन्म पावते. बुरख्याखालीं कुरुपता झांकली जाते, तसें ढोंगासोंगांमागें सामाजिक रोगही लपतात. ही लपवालपवी ललितलेखकाला पटणार नाहीं. समाजांत कुमारिकेच्या मातृपदाचा प्रश्न उपस्थित झाला असला तरी त्यानें त्याला स्पर्शहि करतां कामा नये हा कुठला कायदा? जणुं कांहीं अशा कुमारिकेविषयीं सहानुभूति दाखवणें म्हणजे इतर कुमारिकांना तिचें अनुकरण करण्याचा सल्ला देण्यासारखेंच आहे! दिवसा कडक उपवासाचें सोंग करून रात्रीं शिरापुरीवर ताव मारणारे ढोंगीबुवा समाजाला खपतात; पण भर दुपारीं भुकेनें व्याकूळ होऊन भाकरीची चोरी करणारा भिकारी मात्र त्याला चालत नाहीं. विज्ञान–शास्त्रें, मानस–शास्त्र, अर्थशास्त्र, समाज–शास्त्र इत्यादिकांची आजची प्रगति लक्षांत घेऊन नीति–अनीतीचा नवा निकष खुशाल निर्माण करा. ललितलेखक कांहीं मंगळावरून उतरून आपलें लेखन करीत नसतो. त्याच्या लिखाणांतून व्यक्त होणाऱ्या कल्पना–भावना त्याच्या समाजाच्या अंतर्मनांत घुटमळत असतातच कीं नाहीं? केवळ कामुकतेला चाळविणारें विलास–वर्णन कोणतें आणि शृंगार–रसाचा सुंदर परिपोष करणारें वर्णन कोणतें हें तारतम्य टीकाकारापाशीं असलें पाहिजे.

‘ तिनें त्याच्याकडे पाहिलें ’ असें वाक्य येतांच टीकाकारांची वहिमी नजर लेखकाकडे वळूं लागली तर सारा ग्रंथ तिथेंच संपायचा ! या पद्धतीच्या टीकाकारांची समाज–हिताची कळकळ स्तुत्य आहे. पण थंडीवाऱ्यांत आणि उन्हापावसांत मुलाला मुळींच न जाऊं देणारी आई–सद्बुद्धीनें कां होईना–त्याची प्रतिकार–शक्ति जशी कमी करते, त्याप्रमाणें सत्याचें खरें स्वरूप पाहण्याचें समाजाचें सामर्थ्यहि अशी मंडळी खुरटवून टाकतात. भूतकाळाला सोनें लागलें असलें तरी भविष्यकाळावर हिरेमाणकें चमकायचीं आहेत हें त्यांनीं विसरूं नये. मानव–जातीला सुखसंपन्न करण्याचा मक्ता कोणत्याही धर्माला, देशाला अगर पुस्तकाला मिळणें शक्य नाहीं. तो सहृदयतेनें जगाकडे पाहणाऱ्या आणि जगांतलीं दुःखें पाहून तडफडणाऱ्या, धडपडणाऱ्या मानवी बुद्धीकडेच नेहमीं राहणार.

टीकाकारांचा हा वर्ग सोडून दिला तरी सध्यांच्या मराठी वाङ्मयावर असंतुष्ट असणारे अनेक रसिक आहेत. असंतोषाच्या पोटींच नवी सृष्टि उत्पन्न होत असते. तेव्हां त्यांची टीका तिखट असली तरी ती परिणामीं हितकारकच होईल. आजच्या मराठी वाङ्मयाच्या नदींतला मोठ्यांतला मोठा मासा जर जागतिक वाङ्मयाच्या सागरांत नेऊन सोडला तर तिथले लहान मासे सुद्धां त्याला खाऊन टाकतील असें ते म्हणतात. जागतिक वाङ्मय किंवा हिंदुस्थानांतील परप्रांतीय वाङ्मय यांचा तुलनात्मक अभ्यास करण्याकडे मराठी साहित्यिकांचें असावें तसें लक्ष नाहीं, हें कोण नाकबूल करील ? माडाच्या शेजारींच वाढणाऱ्या तुळशी नेहमींपेक्षां अधिक उंच होतात असा अनुभव आहे. मराठी साहित्याच्या विकासाला जागतिक साहित्य निःसंशय असें उपयोगी पडेल. माळावरला एरंड होण्यापेक्षां अरण्यांतील जांभळीचें झाड होण्याची ईर्ष्या केव्हांही श्रेष्ठच ! या जांभळीपासून आंबे मिळत नाहींत म्हणून मात्र तिची निंदा होऊं नये. लेखकाची व्यक्तिमत्ता विकासशील असते हें खरें; पण त्या विकासाला परिस्थितीचीं बंधनें असतातच ! रशियांत टर्जिनेव्ह, डोस्टोव्हेस्की, टॉलस्टॉय, व चेकॉव्ह होऊन गेल्यामुळेंच गॉर्कीचें वैशिष्ट्य पूर्णतेला गेलें. हरिभाऊ आपट्यांच्या पाठोपाठ तसा लेखक मराठींत निर्माण होण्याची अपेक्षा भलत्याच उतावळेपणानें करण्यांत काय अर्थ आहे ? उच्च आदर्शाप्रमाणें पूर्व वाङ्मय,

परिस्थिति, स्वतःच्या मागील कृतीच्या मानानें लेखकानें दाखविलेली प्रगति, इत्यादि कसोट्या टीकाकारापाशीं असल्या तर त्याच्या निःपक्षपाती टीकेनें लेखकाचा फायदाच होईल. या बाबतींत जरूर तेवढी खेळाडू वृत्ति दुर्दैवानें उभयपक्षीं दाखविली जात नाहीं. याचें प्रत्यंतर पहायला लांब जायला नको. अभ्यासपूर्ण टीकालेख अनेक मासिकांचे अंकच्या अंक चाळले तरी मिळत नाहींत. उलट कितीतरी नियतकालिकांचा कोणताहि अंक पहावा. आपल्या गैरमर्जीतील साहित्यिकांना ओचकारा, चिमटा, गुद्दा, चावा, कांहींतरी त्यांत असतेंच! कित्येक प्राण्यांना आपले मतभेद यापेक्षां अन्य रीतीनें प्रदर्शित करण्याची शक्ति निसर्गानें दिलेली नसते. पण वाङ्मयांतील टीकाक्षेत्र पूर्णपणें या प्राण्याच्या हवालीं करणें म्हणजे माकडाला सर्कशीचा मॅनेजर करण्यासारखें आहे.

चालू घटकेला डोळ्यांपुढें असणाऱ्या साहित्यक्षेत्रांतील कांहीं प्रश्नांविषयीं बोलतां बोलतां इतका विस्तार झाला! वर्तमानपत्राचें आपल्या दैनिक जीवनांत जें स्थान तेंच असल्या चर्चेचें साहित्यमंदिरांत असतें. परंतु आपल्यापैकीं प्रत्येकजण वर्तमानपत्राच्या ताज्या अंकावर झडप घालीत असला तरी ग्रंथवाचनाचा उदात्त आनंद त्यांत मिळतो असें कोण म्हणेल! निर्मितीचा आनंद चर्चेपेक्षां असाच श्रेष्ठ असतो. वाङ्मय–क्षेत्रांत वादांची धूळ उडत असली तरी ती आपल्या डोळ्यांत जाऊं न देण्याची काळजी प्रत्येक साहित्यिकानें घेतली पाहिजे. आपल्या जिल्ह्यांत काय अगर इतरत्र काय, साहित्यसेवा हा अजून उपजीविकेचा धंदा होऊं शकत नाहीं. शंभरापैकीं नव्वद लेखक बहुधा हौसेनें अगर क्वचित् मनाच्या तळमळीनें लिहितात. अशा हौशी पण गुणी लेखकांना मी एक नम्र विनंति करतों. त्यांनीं आपलें क्षेत्र आंधळेपणानें निवडूं नये. लघुकथा अगर त्यासारखें कलात्मक वाङ्मय निर्माण करण्याच्या नादाला लागून अनेक होतकरू लेखकांचा उत्साह वाया जातो. 'शिखरावर नेहमींच जागा असते' या न्यायानें असल्या क्षेत्रांत कितीहि गर्दी झाली तरी असामान्य लेखक चटकन पुढें येतो हें खरें. पण शिखर गांठायला लागणारें त्राण साऱ्यांच्याच पायांत असतें असें नाहीं. अशा हौशी लेखकांनीं इतर मोकळ्या क्षेत्रांकडे लक्ष दिलें तर किती चांगलें होईल? वाढत्या साक्षरतेबरोबर विविध बाल-वाङ्मय निर्माण होणें आवश्यक

आहे. परदेशांतील बाल-वाङ्मय पाहिलें कीं एखाद्या राजकन्येच्या बहुमोल खेळ-ण्यांची आठवण होते; पण आपल्या वाङ्मयांतील त्याच शाखेकडे पाहिलें तर एखाद्या दरिद्री बाईनें आपल्या मुलाला खेळविण्याकरितां जुने रंगीत डबे आणि चिंध्यांच्या बाहुल्या कुठून तरी गोळा केल्या आहेत असा भास होतो. आपलें जीवन विज्ञान-युगाच्या प्रवाहाबरोबर वाहत असून समाजांतील सर्व-सामान्य मनुष्याचें ज्ञान मात्र अर्धे शतक तरी मागें रेंगाळत आहे. आजच्या बाल-तरुणांनीं उद्यां नवयुगांत सैनिकांना शोभण्यासारखी कामगिरी करून दाखवायला हवी असेल तर या युग-माहात्म्याचीं बीजें त्यांच्या अंतःकरणांत आज रुजलीं पाहिजेत. बहुजनसमाजाला बुद्धिवादी करण्याचें केवढें तरी कार्य आजच्या लेखकांपुढें आहे. या कार्याला साहित्याच्या प्रत्येक क्षेत्रांत व हरएक क्षेत्राच्या प्रत्येक शाखेंत हवा तितका वाव मिळेल. गोमंतकाला पोर्तुगीज-फ्रेंच, इंदूर-ग्वाल्हेरला हिंदी-उर्दू, नागपूरला बंगाली, बडो-द्याला गुजराथी आणि बेळगांव-धारवाडला कानडी या भाषा कांहीं परक्या नाहींत. त्यांच्यांतील उत्कृष्ट कृतींचे अनुवाद झाले तर सौंदर्य व स्फूर्ति असा दुहेरी लाभ मराठीला होईल. अशा प्रकारचें विविध वाङ्मय कदा-चित अजरामर होणार नाहीं. परंतु अमरपट्टा बांधून लेखकानें कंबर कसली म्हणजे अमर ललित-वाङ्मय निर्माण होतें असें थोडेंच आहे! शाकुंतल लिहितांना कालिदासाला कितीसा आत्मविश्वास होता?

मराठी साहित्याची सर्वांगीण वाढ झपाट्यानें व्हायला महाराष्ट्र विद्या-पीठाची आवश्यकता आहे. हें विद्यापीठ कुठेंही होवो! पण तें शक्य तितक्या लवकर झालें पाहिजे. साहित्यसंस्था व शिक्षणसंस्था यांनीं या कामीं कसून प्रयत्न करण्याची वेळ आली आहे. विद्यापीठ झाल्या-वांचून उच्च दर्जाचें टीकावाङ्मय, विविध प्रकारचे विज्ञान ग्रंथ, आणि बहुजनसमाजाची सुसंस्कृतता या गोष्टी आपल्यामध्यें अल्प प्रमाणांतच दिसत राहतील.

विद्यापीठाप्रमाणें लिपीचाही प्रश्न मराठी साहित्यिकांनीं एकमतानें सोड-विला पाहिजे. एकेकाळीं लेखनाकरितां स्वीकारली गेलेली लिपी आजच्या छापखान्याच्या काळांत तशीच चालू ठेवणें इष्ट आहे काय? सावरकरांच्या

पद्धतीनें मजकूर अधिक लवकर मुद्रित होऊं शकतो असें म्हणतात. याचा अर्थ मुद्रणाला सुलभ अशी लिपी अंगिकारली तर अप्रत्यक्ष रीतीनें वाङ्मय-प्रसारालाहि साहाय्य होईल.

आजच्या साहित्यिकांत लिपीपासून वाङ्मयाच्या कार्यापर्यंत कितीहि मतभेद अगर रुचिभिन्नत्व असलें तरी ते सर्व मराठीचे निःसीम भक्त आहेत. या शारदामंदिरांत केळकरांच्या मांडीला मांडी लावून केतकर बसले आहेत, आणि ना. सी. फडक्यांच्या समोरच ना. ह. आपटे दिसत आहेत. या क्षणीं अत्रे आपल्याला हंसवतील तर पुढल्याच क्षणीं यशवंत आपल्या डोळ्यांत पाणी उभें करतील. सावरकरांचें खड्गयुद्ध आणि र. धों. कर्व्यांचें शरसंधान या दोन्ही गोष्टी कुणाला प्रेक्षणीय वाटणार नाहींत? आहिताग्नि राजवाड्यांपासून भाई डांग्यांपर्यंत सर्व उपासकांची सेवा सध्यांची मराठी शारदा हंसतमुखानेंच स्वीकारीत आहे यांत संशय नाहीं.

वाङ्मयनिर्मिति म्हणजे नव्या सृष्टीचा जन्म! अशी सृष्टि तपश्चर्ये-वांचून उत्पन्न होत नाहीं. कलेचा दर्जा जितका उच्च तितकें तिच्यांत दिसणारें जीवनाचें—वास्तवाचें प्रतिबिंब अधिक सुंदर! मराठी लेखन-कलेला हा दर्जा प्राप्त करून देण्याकरितां जरूर ती तपश्चर्या करायला आपण तयार आहों असा संकल्प सोडण्याकरितांच संमेलनें भरत असतात. आज आपल्याकरितां हा संकल्प सोडण्याचा मान मला दिल्याबद्दल आपले मनःपूर्वक आभार मानून तो सत्यसृष्टींत उतरविण्याची मी येथें जमलेल्या सर्व लहानथोर साहित्यिकांना विनंति करतों.

---